१८५०. विठ्ठल माउली कृपेचि सावली । आळवितां घाली प्रेम पान्हा। १ ।
न सांगतां सर्व जाणे तान्ह भूक । जवळी व्यापक न विसंबे। २ ।
माया मोह कैसा करावा सर्वथा । अंतरींची व्यथा तोचि जाणे। ३ ।
सुखशांति रूपें लेवविलीं अंगीं । लागों नेदी धगी संसाराची। ४ ।
देऊनि अभय करें कुरवाळी । करित सावली पीतांबरें। ५ ।
मुखीं नाम माळा कीर्तन श्रवणीं । लेवविलीं लेणीं नवविध। ६ ।
नयनीं अंजन सूदलें सांवळें। समाधान झालें सर्व अंग । ७ ।
अच्युत अनंत सुवर्णाची पेटी। घातलीसे कंठीं निर्विकार। ८ ।
चतुर्भुज शोभा रूप मध्यें मणि । प्रभा त्रिभुवनीं विराजित। ९ ।
मुक्तलग शुद्ध बिंदुली गोजिरीं। पद्महस्त शिरीं स्थापितसे। १०।
संत पायरज कपाळीं टिळका। नाहीं भय शंका कळिकाळा। ११।
सगुण साजिरा कटीं कडदोरा। अवर्ण दुर्भरा दृढबोधु। १२।
काम क्रोधादिक करूनि पुतळे। पायी जे घातले पायवाट। १३।
वासनेची दृष्टि लागेल त्या झणीं। उभा चक्रपाणि मागें पुढें। १४।
संतपायीं नामा शृंगार मंडितु। अखंड क्रीडतु महाद्वारीं। १५।

१८५१. दुरोनि ओळंगिल्या अविनाश देताहे । तो जवळी जातां काय देईल नेणों। ध्रु०।
ऐसा तूं कृपाळु लक्षुमीचा कांत। सांडूनि होतात कष्टी झणीं।
सेवा माझा स्वामि वैकुंठनायक। भुक्ति-मुक्तिनायक पांडुरंग। १ ।
साधिलें नगर देऊनियां शिर। कष्ट दशशिरें एवढे केले।
तें दिलें बिभिषणा एका नमस्कारा। त्या माझ्या उदारा कां न भजा। २ ।
मांडीवरी बैसों नेदी सापत्न माता। म्हणे राजसुता नव्हसी तूं।
हें ऐकोनी वना जाय तो तत्त्वता। सकळ देवा माथां वरिष्ठ केला। ३ ।
दुर्योधनें भोजना बहु केले सायास। परि न घे ग्रास तया घरीं।
विदुराचे घरीं न पुसतां जाय। भक्ति प्रीय होय स्वामि माझा। ४ ।

अर्जुनाचे कार्जी सांडी निज पैजा। सुदर्शन वोजा धरियेलें ।
आपण लटिका झाला भीष्म साच केला। काळाचा अभुला स्वामि माझा। ५ ।
दीक्षित अवदान देता निज करीं। परि मुख न करी तयांकडे ।
सुदाम्याचे पोहे देखे दृष्टिभरी। तयासी श्रीहरी पसरी हात । ६ ।
म्हणुनि हा गावा म्हणुनिया ध्यावा। तोचि आराधावा हृदयकमळीं।
हरिगुण नाम हेंचि प्रिय आम्हां। कीर्ति गाय नामा होऊनि भाट। ७ ।

१८५२. अणिमादि सिद्धि जयाचिया दासी । उणें तयापासीं काय आहे । १ ।
आणिकाचे द्वारीं सांडोवा पैं होसी। धिग् धिग् न लाजसी अरे जना। २ ।
सुलभ सोपारा सेवा माझा स्वामी। म्हणतां जोडे नामीं एक वाचे। ३ ।
अजामेळ वैकुंठा एक नेला नामें । गणिका विमानें स्वयें नेली । ४ ।
ऐसा हा कृपाळु आसनीं शयनीं। न विसंबावा मनीं भाग्यवंतीं। ५ ।
जटायु पक्षियाचें स्वयें झाला लेंकरूं। त्याचा क्रियापारु केला रामें । ६ ।
शबरीचीं फळें उच्छिष्टेंही खाय। मा विसरती पाय कैसे प्राणी। ७ ।
शाहाणिया द्वारपाळ म्हणतां लाज थोरी। जरी झाला भिकारी न साहे। ८ ।
तो बळीचा द्वारपाळु सारथी पार्थाचा। तो गोसावी आमुचा देवराणा। ९ ।
गर्भवास तया न होती रे जना । म्हणोनि लोक भजना प्रवर्तले। १०।
अंबऋषिराया सांपडले सायास । साहिला गर्भवास सकळ देवें। ११।
उच्छिष्ट हेंचि खातां प्रायश्चित्त असे। तो गोपाळाचें कैसें खाय हरी। १२।
त्या सुखा सुरवर जन्म इच्छितातीं। ऐसा लक्ष्मीपति कां न सेवावा। १३।
म्हणोनि सोइरा आन दुजा नाहीं। गुरु पिता पाहीं हाचि बंधु। १४।
सज्जन सांगाती अनेक नाहीं आम्हां। कीर्ति वर्णी नामा होऊनि भाट। १५।

१८५३. पांडव भाग्याची वर्णावया थोरी। शेषाची वैखरी न वर्णवे। १ ।
पीतांबर कास घालूनि वनमाळी। काढी उष्टावळी आवडीनें। २ ।
विधीचा जनक रमा ज्याची दासी। ध्यान अहर्निशीं करी शिव। ३ ।

रोमीं जयाचे ब्रह्मांडें अनंत। चारी वेदां अंत न कळे ज्याचा। ४ ।
नामा म्हणे राबे भक्तांचिये घरीं। भाव देखोनि हरि भुलतसे। ५ ।

१८५४. नेणे साही शास्त्रें तुज केशिराजा। स्वरूपें कुबजा काय होती। १ ।
न मागें मी तैसा न मागें मी तैसा। न मागें मी तैसा कदा काळीं। २ ।
कौरवांचे काजीं घेसी गाढेपण। धर्मा घरीं पूर्ण घोडे धुसी। ३ ।
नामा म्हणे आम्हीं कीर्ति वाखाणावी। भक्तांसी गोसांवी होसी देवा। ४ ।

१८५५. काय वानुं आतां पायाचा महिमा। जेथें झाली सीमा बोलायाची। १ ।
विठोबाचे पाय आठवितां मनीं। गेलें हरपोनी भवभय। २ ।
पाय नारदानें हृदयीं धरितां। ब्रह्मांडीं मान्यता झाली त्याची। ३ ।
सनकादिकांलागीं पाय वज्र कवच। ब्रह्मादिदेवांस पद जेणें। ४ ।
लागतांचि पाय शिळा दिव्य झाली। पाषाण तारिले उदकावरी। ५ ।
पाय ते रमेचे सौभाग्य साजिरें। योगि ऋषीश्वर थोर जेणें। ६ ।
नामा म्हणे मनीं पाय सर्वकाळ। म्हणोनि सुकाळ आनंदाचा। ७ ।

१८५६. उभा भीमातिरीं कर कटावरी। राहे निरंतरी भक्तांपुढें। १ ।
भक्तभाग्य थोर नव्हे कधीं प्राप्ती। जाणोनि श्रीपती गुज बोले। २ ।
गणिका गजेंद्र उद्धव नारद। आपण गोविंद मिळोनियां। ३ ।
समुद्रमंथनीं उभा करोनिया। लागतसे पाया नामा म्हणे। ४ ।

१८५७. जो हे सदाशिव योगी। ज्याची लक्ष्मी राजभोगी। १ ।
ज्याचे नवनिधी घरीं। कामधेनु वसे द्वारीं। २ ।
नित्य वसे चिंतामणी। सदा शिवाचे सदनीं। ३ ।
दिली बिभिषणा लंका। काय ठावा तिहीं लोकां। ४ ।
देह बुद्धि जाल्या नाश। काय घेतला संन्यास। ५ ।
नामा म्हणे दासापाशीं। रिद्धी सिद्धी घरीं दासी। ६ ।

१८५८. गगनीं ध्रुव तुवां अढळ पैं केला । तो बाळ धाकुला न म्हणसी । १ ।
अजामेळाचें तुवां चुकविलें संकट । ब्राह्मण तो नष्ट न म्हणसी । २ ।
प्रऱ्हादाचा तुवां केला कैवारु । वैऱ्याचा कुमरु न म्हणसी । ३ ।
गजेंद्रपशु सोडविला पानडियें । मगर वोढि ऐसिये न म्हणसी । ४ ।
रुक्मांगदाची तुवां उद्धरिली नगरी । विषयीं मुरारी न म्हणसी । ५ ।
ऐसे अपराधी न म्हणसी देवा । नामा तो केशवा विनवितसे । ६ ।

१८५९. खगावरी स्वारी करूनियां देवा । धांवसी केशवा भक्तांसाठीं । १ ।
रामा परशुरामा कृष्णा नारायणा । हरी संकर्षणा भक्तांसाठीं । २ ।
बिभीषण तारी रावणासी मारी । दावी भाव हरी भक्तांसाठीं । ३ ।
नामा म्हणे भक्तांकारणें गोविंदा । घेवोनियां गदा उभा ठासी । ४ ।

१८६०. कौस्तुभ सोज्वळ कंठीं शोभताहे । भक्तांसाठीं बाहे उभारिली । १ ।
आन हितासाठीं करिसी धांवण्या । विदुराच्या कण्या गोड करी । २ ।
ब्रह्मचारी साक्ष सत्यत्वें करिसी । पुढें तूं धांवसी आवडीनें । ३ ।
वचना अंतर पडों नेदी सत्य । नामा म्हणे भृत्य होसी देवा । ४ ।

१८६१. दर्दुराचें पिलूं म्हणे रामकृष्ण । नाहीं उदक उष्ण झालें तेथें । १ ।
कढईमध्यें बाळ करी तळमळ । गोविंद गोपाळ पावे वेगीं । २ ।
तये काळीं आज्ञा केली पावकासी । झणीं तापविसी तयालागीं । ३ ।
ऐसा तो कृपाळु आपुलिया दासा । आमुचा कोंवसा नामा म्हणे । ४ ।

१८६२. देवा पांडुरंगा वासुदेवा हरी । गोविंदा मुरारी नारायणा । १ ।
नारायणा कृष्णा कमळलोचना । माधवा प्रद्युम्ना रावणारी । २ ।
रावणारी होसी जानकी टाकुनी । हिंडसी अंगणीं अर्जुनाच्या । ३ ।
अर्जुनाच्या घरीं अंगें घोडे धुसी । लज्जा द्रौपदीची राखियेली । ४ ।
राखतोसी द्वार भक्ति बळिवंता । नामा म्हणे आतां काय सांगूं । ५ ।

१८६३. भरतें त्यागिली जननी । ख्याति झाली त्रिभुवनीं । १ ।
ऐसी भक्ति तुझी हरी । जगीं करंटा न करी । २ ।
बंधु अवज्ञी बिभिषणा । प्रगट झाला रामराणा । ३ ।
प्रल्हाद पितृआज्ञा न करी । स्तंभीं प्रगटला नरहरी । ४ ।
पति अवज्ञा ऋषिपत्न्यांसी । कृष्ण दर्शन पूर्ण त्यांसी । ५ ।
नामा म्हणे भक्ता अवरोधीं पाही । त्यासी त्यजिल्या दोष नाहीं । ६ ।

१८६४. पंढरीचा देव बहुत कोंवळा । सगुण सांवळा सारथी हा । १ ।
सारथी सर्वांचा साक्षिभूत असे । संकटीं सायासें गजेंद्रासी । २ ।
गजेंद्रासी रक्षी गणिका उद्धरी । भिल्लीणीचे करीं फळें भक्षी । ३ ।
भक्षी सुदाम्याचे पोहे मुष्टिभरी । नामा म्हणे हरि गोड मानी । ४ ।

१८६५. पंढरीचा देव पाहातां सगुण । प्रल्हादाकारणें सिद्ध झाला । १ ।
पंढरीचा देव पतितपावन । उभा नारायण विटेवरी । २ ।
पंढरीचा देव प्रत्यक्ष उदार । बाळ्या भोळ्या पार दावितसे । ३ ।
नामा म्हणे देवा कीर्ति वानूं काय । आम्हांसाठीं सोय लावीं बापा । ४ ।

१८६६. नेणें मन कांहीं विश्वास नामाचा । गोसावी आमुचा पांडुरंग । १ ।
संसारीं पडलों कर्माचे भांडारीं । कृपा निरंतरीं करीं मज । २ ।
नेणें तुझें ध्यान नेणें तुझें प्रेम । दावी मज वर्म सेवकासी । ३ ।
नामा म्हणे माझे गुणदोष कांहीं । ठाव तुझे पायीं देईं मज । ४ ।

१८६७. ऐकें मोक्षाची मी कथा । तेणें भय वाटे चित्ता । १ ।
देवा कांहीं नमगे नमगे । मौन असें संतसंगें । २ ।
ऐकें मुक्तीचिया गोष्टी । तेणें होतसें हिंपुटी । ३ ।
ऐकें समाधिची गोडी । मन तुझे पायी ओढी । ४ ।
ऐके स्वर्गसुख थोरी । भेणें कांप येतो भारी । ५ ।
नामा म्हणे अभयदान । देउनि सांगें प्रेमखूण । ६ ।

१८६८. सुख दुःख दोन्ही आम्हासी सारिखीं । प्रतीति पारखी मना आली। १ ।
अंतर्बाह्य एक ब्रह्मचि कोंदलें। दुजेपण गेलें निपटोनी। २ ।
त्वचा टाकूनियां सर्प गेला बिळीं। मग ती सांभाळी कोण सांगा। ३ ।
ओघ सोडूनियां गंगा सिंधू ठाये । विस्तारली धाये खळाळाची। ४ ।
नामा म्हणे रात्र जैसी कां पाहाळे । धारणातें झाले तैसें आम्हां। ५ ।

१८६९. आम्हां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा । विश्वास नामाचा सर्वभावें। १ ।
तरी हरिचे दास म्हणतां श्लाघिजे । निर्वासना कीजे चित्त आधीं। २ ।
गाऊं नाचों आम्ही आनंदें कीर्तनीं । भुक्ति मुक्ति दोन्ही न मागूं तुज। ३ ।
वृत्तिसहित मन बुडे प्रेम डोहीं । नाठवती देहीं देहभाव। ४ ।
सगुणीं निर्गुणीं एकचि आवडी । मनें दिली बुडी चिदाकाशीं। ५ ।
नामा म्हणे देवा ऐसी मज सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं। ६ ।

१८७०. निद्रिस्ताचे सेजे सर्प कां उर्वशी । पाहों विषयासी तैसें आम्ही। १ ।
ऐसी कृपा केली माझ्या केशिराजें । प्रतितीचें भोजें एकसरां। २ ।
शेण आणि सोनें भासतें समान । रत्न कां पाषाण एकरूप। ३ ।
पायां लागो स्वर्ग वरी पडो आग । आत्मस्थिति भंग नोहे नोहे । ४ ।
नामा म्हणे कोणी निंदा आणि वंदा । झालों ब्रह्मानंदाकार आम्ही। ५ ।

१८७१. सगुण तें ब्रह्म विटेवरी नीट । कोण्या प्राण्या कष्ट होऊं नेदी। १ ।
देऊनियां क्षेम देह पालटिसी। वृद्ध रूप होसी कर्णासाठीं। २ ।
भजन भक्तांचें मानिसी वचन । नाम नारायण म्हणे कां रे। ३ ।
उफराटी वदवी वाल्मिका नामाच्या। शतकोटी संख्या प्रविस्तार। ४ ।
नामा म्हणे देवा भक्तिचें पैं पिसें । त्यालागीं हव्यासें होसी जाण। ५ ।

१८७२. भक्ताचिया भावा होऊनि ऋणयितु। उभा असे तिष्ठतु पंढरीये। १ ।
महाद्वारींची हे तळींची यापरी । तो वैकुंठावरी कळस केला। २ ।
भूतळींचे वैभव कायसें बापुडें । बोलतां लाज पडे देवराया। ३ ।

त्या सुखाची नव्हाळी कैची रसातळीं। बोलतां बोबडी जिव्हा पडे । ४ ।
म्हणोनि पांडुरंग मौनचि राहिला। नामयानें धरिला दोन्हीं चरणीं । ५ ।

१८७३. तुझा तूं आहेसी एकला एकु। वांयां कां हा शोकु वाढविसी । १ ।
तुझा तूं मानसीं विचारोनि पाहीं। सावध नामया होईं सोय धरी। २ ।
तुझा तूंचि देव तुझा तूंचि भक्त। पाहे पां सिद्धांत गुरुमुखें । ३ ।
तुझा तूंचि पूज्य तुझा तूं पूजिता। भजन भजता तुझा तूंचि। ४ ।
तुझा तूंचि गुरु तुझा तूंचि शिष्य। तुझा उपेदश तुज नामया। ५ ।
नामा म्हणे केशवा हेंचि सर्व माझें। हृदयीं चरण तुझें निरंतर। ६ ।

१८७४. माझ्या मनें तुझ्या चरणीं दिली बुडी । इंद्रियें बापुडीं वेडावलीं । १ ।
आतां विषयसुख जाणावें हें कोणें । जाणोनि भोगणें कोणें स्वामी। २ ।
देह सहज स्थिति राहिले निष्काम। हृदयीं सदा प्रेम वोसंडत। ३ ।
नामा म्हणे केशवा कृपेच्या सागरा। तूं आम्हां सोयरा आदि अंतीं। ४ ।

१८७५. केशवाचे नामया लागलेंसे ध्यान। देखे त्रिभुवन तदाकार। १ ।
जया तया म्हणे माझा चक्रपाणि । जाय लोटांगणीं सर्व भावें । २ ।
प्रेम वोथरत नामाचेनि छंदें। हृदय प्रेमानंदें वोसंडत। ३ ।
धांवूनि येऊनि चरणाजवळीं। वंदी पायधुळी सर्वभावें । ४ ।
घन:श्याम मूर्ति सुंदर सांवळी। ध्यान हृदयकमळीं नित्य राहे। ५ ।
भाग्यवंत नामा भक्तां शिरोमणी । अखंड उन्मनी भोगितसे। ६ ।

१८७६. शाममूर्ति डोळस सुंदर सांवळी । तें ध्यान हृदयकमळीं धरूनि ठेला। १ ।
सकळ स्थिति सुखाचा अनुभव झाला । सकळ विसरला देहभाव। २ ।
पांगुळलें मन स्वरूपीं गुंतलें। बोलणें खुंटलें प्रपंचाचें। ३ ।
सबाह्याभ्यंतरीं स्वरूप कोंदलें। द्वैत निरसिलें चंद्राकारें। ४ ।
निज निर्धारितां नयन सोज्वळ झाले। रोमांच दाटले रवरवीत। ५ ।

नामामृताचा घन वोळला अंबरीं । वर्षाव सहस्र धारीं होत असे। ६ ।
तें क्षीर सेवितां झालें समाधान । चुकलें जन्ममरण कल्पकोडी । ७ ।
सहज सुखें निवाला भवदु:ख विसरला । विसांवा भेटला पांडुरंग। ८ ।
नामा म्हणे देवा दृष्टि लागे झणीं । पुंडलिका धर्में करूनि जोडलासी । ९ ।

१८७७. माता पिता बंधु भगिनी इष्टमित्र विठ्ठला माझा तूं गा । धृ० ।
बापा यावें भेटावें विसांवा माझा तूं गा।
माझा कुळाचार माहेर रे जिव्हारा विठ्ठला तूं गा। १ ।
माझें विद्याधन आयुष्य आरोग्यता विठ्ठला तूं गा।
माझें तप व्रत तीर्थ दान पुण्य विठोबा तूं गा । २ ।
माझा गुरुमंत्र दैवत आगम निगम विठ्ठला तूं गा ।
भूपति सुरपति ब्रह्ममूर्ति विठोबा तूं गा । ३ ।
माझा आचार विचार सत्यवाद थीर धर्म विठोबा तूं गा ।
यश कीर्ति निवृत्ति आतां माझी तृप्ति विठोबा तूं गा । ४ ।
माझे यम नियम प्राणायाम प्रत्याहार विठोबा तूं गा ।
नामा म्हणे विठोबा केशव परमात्मा माझा तूं गा । ५ ।

१८७८. जयालागी हृदय उले । ते म्यां जीवेंसि धरिलें। १ ।
विठ्ठलाचीं पाऊलें । म्यां मस्तकीं वाहिलीं । २ ।
नामा म्हणे मुनि रंगले । तें म्यां जीवेंसि धरिलें। ३ ।

१८७९. अनंत म्हणती माझिया स्वामीतें । अनंत गुण त्यातें म्हणोनियां । १ ।
पतित पावन म्हणती माझिया स्वामीतें । उद्धरी पतितातें म्हणोनियां । २ ।
विश्वंभर म्हणती माझिया स्वामीतें। पोशितो विश्वातें म्हणोनियां । ३ ।
जगजीवन म्हणती माझिया स्वामीतें। जीववी जगातें म्हणोनियां । ४ ।
हृषिकेश म्हणती माझिया स्वामीतें। चाळी इंद्रियातें म्हणोनियां। ५ ।
नामा म्हणे केशव म्हणती स्वामीतें। नासितो क्लेशातें म्हणोनियां। ६ ।

१८८०. सुलभ सोपारें नाम केशवाचें। आठवितां वाचे दोष जाती । १ ।
अनाथाचा सखा उभा नामापासीं। ऐसा तो प्रेमासी भुललासे । २ ।
जातिवंत आम्ही वेदाचे पाठक । तरी सर्व फिकें नामाविण। ३ ।
नामा म्हणे नामीं रंगलों सतत । म्हणोनि अनंतें दिधली भेटी। ४ ।

१८८१. विसांवा विश्वाचा जो प्राण जीवाचा । तोचि नित्य वाचा जपों आम्ही। १ ।
गोविंद वामन भावयुक्त भजन । सर्व जनार्दन हाचि भाव। २ ।
चैतन्य अचिंत्य नाम हेंचि सत्य। नित्यता कृतार्थ विठ्ठलनामें। ३ ।
नामा म्हणे उद्धरण आणिक नाठवे। केशवचि सर्वे पुरे आम्हां। ४ ।

१८८२. अवघा संसार करीन सुखाचा । जरी झाला दु:खाचा दुर्धरु हा। १ ।
विठोबाचें नाम गाईन मनोभावें। चित्त तेणें नांवें सुखावेल। २ ।
इंद्रियांचीं कोडें सर्वस्वें पुरती। मनाचे मावळती मनोधर्म। ३ ।
श्रवणीं श्रवणा नामाचा प्रबंदा। नायकें स्तुतिनिंदा दुर्जनांची। ४ ।
कुंडल मंडित श्रीमुख निर्मळ । पाहतां हे डोळे निवती माझे। ५ ।
विटे सहित चरण धरीन मस्तकीं। तेणें तनु सुखी होईल माझी। ६ ।
संतसमागमें नाचेन रंगणीं। तेणें होईल धुणी त्रिविध तापा। ७ ।
नामा म्हणे सर्व सुखाचा सोइरा। न विसंबें दातारा क्षणभरी। ८ ।

१८८३. नलगे तुझी मुक्ति नलगे तुझी भुक्ति। मज आहे विश्रांति वेगळीच। १ ।
माझें मज कळलें माझें मज कळलें । माझें मज कळलें प्रेमसुख। २ ।
न करीं तुझें ध्यान नलगे ब्रह्मज्ञान । माझी आहे खूण वेगळीच। ३ ।
न करीं तुझी स्तुति न वाखाणीं कीर्ति। धरिलीसे ते युक्ति वेगळीच। ४ ।
न करीं कायाक्लेश इंद्रियां निरोध। माझा आहे बोध वेगळाचि। ५ ।
नामा म्हणे नाम गाईन निर्विकल्प। येसि आपोआप गिंवसीत। ६ ।

१८८४. चाळक माझें मन पांगुळ पैं झालें। हारपोनि गेलें साक्षात्कारें। १ ।
मन हारपलें करूं आतां काय। पहावया गेलें तंव परतोनि कांहीं नये। २ ।

भक्ति ज्ञान वैराग्य नोहे । अवघेंचि आहे अवघें तो आहे । ३ ।
नामा म्हणे जनाबाई आहे वो कैसा । बाबा उदकीं घट बुडोनि ठेला जैसा । ४ ।

१८८५. ऐसें माझे मनीं येतें पंढरीनाथा । न सोडीं सर्वथा चरण तुझे। १ ।
यासि काय करूं सांगा जी गोपाळा। कां स्नेह लावियेला पूर्वींहुनी । २ ।
हृदयीं चित्तवृत्ति मनेंसि मिळोनी । अवघी तुझ्या चरणीं सुरवाडिली। ३ ।
नामा म्हणे केशवा धरिली तुझी सेवा। सुखा अनुभवा अनुभविलें। ४ ।

१८८६. संसाराची सोय चुकलें बापुडें। केशव मागें पुढें सांभाळित । १ ।
आळीकर नामें खेळे महाद्वारीं । आंतून बाहेरी न वचे कांहीं। २ ।
संतां तें देखोनी मिठी घाली चरणी। कुरवंडी करूनी देह टाकी । ३ ।
ऐसें निजबोधें राहिले निवांत। नामा राहे एकांत केशव चरणीं। ४ ।

१८८७. माझें सर्व भाग्य केशवाचे पायीं । आणिक उपाय नेणों आम्ही। १ ।
पक्षी अवचित अंगणांत आला। घेऊनियां गेला चारा तेणें। २ ।
हाटकरी आम्ही हाटासी पैं गेलों। फिरोनियां आलों गांवामाजीं । ३ ।
नामा म्हणे नमूं सर्व जीवजंत। दिसे ते अनंत दृष्टीपुढें । ४ ।

१८८८. योगी हे शिणती तुझिये प्राप्तिलागीं । नातुडसी जगीं कवणासी । १ ।
एक जटा नखें स्वयें वाढविती। दिगंबर होती एक देवा। २ ।
त्यांसी तुझी भेटी नव्हेचि कल्पांतीं। अखंड शिणती साधनानें । ३ ।
आमुचे सन्निध सर्वदा राहसी । आमुच्या भाग्यासी पार नाहीं। ४ ।
धन्य झालों आम्ही तुझिया प्रसादें। नाचे तुझ्या छंदें नामदेव। ५ ।

१८८९. पंढरी ज्ञानिया घ्यातां लक्षा नये। आम्हां वाट पाहे अनाथांची । १ ।
जपकांचें जाप्य नानामंत्रमय। आम्हां भक्ति प्रिय भावें सारी। २ ।
पुंडलिकासाठीं वोळला वोरसें । नेणों काय कैसें प्रेम त्याचें । ३ ।
नामा म्हणे जीवें करूं निंबलोण। झणीं नारायणा दिठावसी । ४ ।

१८९०. दाही दिशा पाहतां दिसती निर्मळ । स्फुरण वक्ष:स्थळ होत असे। १ ।
येईल माझा विठो देईल आलिंगन। जीवें निंबलोण करीन त्यासी। २ ।
प्रेमपूर भरतें सुखसिंधू लोटली। माउली भेटली जिवलग। ३ ।
धरूनि हनुवटी सांगेल गुज गोष्टी। पाहील कृपादृष्टी माझें म्हणोनि। ४ ।
प्रीतीचे पडिभरें कुर्वाळील मज। सांगेन निजगुज संसारींचें। ५ ।
हर्षे निर्भर नामा निवाला निवाडें। नाचे संतांपुढें सांगे गुज। ६ ।

१८९१. अपत्याचे परी सांभाळितो श्रीहरी। वाट निरंतरीं पाहातु असे। १ ।
संसारी कष्ट झाले बहु भारी। मज निववी हरी मायबापा। २ ।
गांव तें पंढरी भिंवरेच्या तीरीं। निरोप माहेरीं सांगें जो कां। ३ ।
क्षीरसागरा भीतरीं पहुडले श्रीहरी। कवण धाक करी कुमारीचा। ४ ।
पुंडलिकाची भक्ति मांडली चराचरीं। गुढिया निरंतरी उभारिल्या। ५ ।
संत सनकादिक ते माझे सज्जन। द्वारीं असे वाहन गरुडाचें। ६ ।
रखुमाई माता विठो माझा पिता। नामा म्हणे संतां भेटावया। ७ ।

१८९२. मायबापांपरीस लोभ तुझा हरी। आहे मजवरी केशिराजा। १ ।
आतां जाणसी तें कृपाळुवा करीं। लाज सर्व हरी आहे तुज। २ ।
माझें जातिकुळ नाहीं त्वां पुसिले। अन्याय साहिले कोट्यानकोटी। ३ ।
जन्मोजन्मीं मज घातलें पाठिसी। संकटीं रक्षिसी नारायणा। ४ ।
देऊनि प्रेमभातें पाळिलें पैं मातें। साउली तळहाते केली देवा। ५ ।
जे खुण जाणती तेचि माझे सखे। मी तुझें लाडकें म्हणवीं देवा। ६ ।
नामा म्हणे कांय होऊं उतराई। पुढें जन्म नाहीं ऐसें केलें। ७ ।

१८९३. नित्य आम्हां सुख तुझ्या पायांपासीं। शरण कोणासी जाऊं आम्हीं। १ ।
सकाळीं उठोनि ऐकतों कीर्तन। तेणें समाधान मज होय। २ ।
उभा महाद्वारीं वैष्णव भेटती। सांखळ्या तुटती चौऱ्यांशीच्या। ३ ।
नामा म्हणे सदा पंढरी रहिवास। मागुता जन्मास येतो कोण। ४ ।

१८९४. ऐकतां कीर्तन होती जीवन्मुक्त। दाविसी अनंत नाममात्रें। १ ।
मृत्युलोकीं जो जन्म इच्छी नर। त्याच्या पुण्या पार कोण वाणी। २ ।
भक्तिसारामृत श्रेष्ठ कलियुगीं। उद्धरिले योगी ब्रह्मादिक। ३ ।
नामा म्हणे मज नाहीं चिंता भय। हृदयीं तुमचे पाय पुरे आतां। ४ ।

१८९५. कीर्तनाच्या सुखें सुखी होतो देव । कोणतें वैभव वाणी आतां । १ ।
अंत्यज आणि जातिवंता । मुखीं नाम घेतां उडी घाली। २ ।
बैसोनी आसनीं आळवितां नाम। उभा सर्वोत्तम तयापुढें। ३ ।
प्रेमाचिया भरें उभ्यानें गर्जत। नाचे हा अनंत तयासवें । ४ ।
नामा म्हणे तया कीर्तनाची गोडी। घालितसे उडी नेटेपाटे । ५ ।

१८९६. मुक्तपण आम्हां नको देवराया। भेटी मज पायां पुरे बापा। १ ।
चातुर्यपणाची नको मज चाड । प्रेमभाव गोड पुरे बापा । २ ।
खाय भिल्लिणीचीं फळें आवडतीं । काय त्याचे चित्तीं दुजा भाव। ३ ।
भावापाशीं देव उभा सर्वकाळ । खेंचरानें बळें दाखविला। ४ ।
नामा म्हणे मज सद्गुरुची सत्ता। आम्हासि मुक्तता नको बापा। ५ ।

१८९७. व्यापकापरीस मन केलें वाड। सांपडलें गोड प्रेमसुख । १ ।
जिकडे पाहें तिकडे विठोबा अवघा। भीमा चंद्रभागा पुंडलीक । २ ।
बाहेरीं भीतरीं सर्व निरंतरीं । ब्रह्मांड पंढरी झाली मज । ३ ।
महुरलें तरुवर फळीं पुष्पीं भार । तेंचि निर्विकार सनकादिक । ४ ।
आवडीचा आनंदु तोचि वेणुनादु । अनुभवें गोविंदु गोपवेशें। ५ ।
नामा म्हणे विठो भक्तिच्या वल्लभा। मागें पुढें उभा सांभाळित। ६ ।

१८९८. ध्यानीं ध्यातां मनीं हाचि येउनी बैसे। गीतीं गातां वसे हृदयकमळीं। १ ।
बाहेरी भीतरीं वेधिलें वो येणें । रुक्मिणीरमणें पांडुरंगें। २ ।
याविण दुसरें मज कांहींच नाठवे। लागलीसे सवे गोपाळाची। ३ ।
भोगिता या जीवा कांहींच नावडे। वाचोनी पवाडे गोपाळाचे । ४ ।

निद्रां आणि जागृतीं स्वप्नीं आणि सुषुप्तीं । देखें कृष्णमूर्ति सर्वगत । ५ ।
ऐसा अखंड विदेही लौकिका विरहित । नामा जिवन्मुक्त होउनी ठेला । ६ ।

१८९९. जाये जाये जाये परतोनि पाहे । लाचावला जीव पर न लगे सोय गे माय । १ ।
नावेक विठ्ठल पाहूं द्या साजणी । न पुरे गे धणी डोळियांची । २ ।
देखिला गे माय लावण्यसागर । नामया दातार केशिराज । ३ ।

१९००. सर्व देवांमाजी विठ्ठल वरिष्ट । बोलतसे स्पष्ट वेदशास्त्रीं । १ ।
अच्युता अनंता माधवा मुकुंदा । गोपाळा गोविंदा गोपवेषा । २ ।
कृष्णा कमलाक्षा कस्तुरीचा टिळा । नेसला पाटोळा खोंचे शिरीं । ३ ।
नामा म्हणे रामकृष्ण नारायण । तारिसी पाषाण सिंधूमाजी । ४ ।

१९०१. योगी मुनि जन तपस्वी याज्ञिक । ते तंव पादुका वंदिती शिरीं । १ ।
हरिहर ब्रह्मा सूर्य चंद्रादिक । ओढवीती मस्तक रजरेणु । २ ।
गंगा भागीरथी होती शुचिमंत । आणिकांची मात काय सांगों । ३ ।
नामा म्हणे नेणों पार तुझा देवा । कृपाळु केशवा केशिराजा । ४ ।

१९०२. चातुर्यसागरा आमुची जननी । जाणते रुक्मिणी प्रेमकळा । १ ।
चरणींची प्रभा जाणे मणिग्रीव । नकुळ वैष्णव सखे माझे । २ ।
कुबेर गौतमवधू अहिल्या । चक्रपाणि तया मुक्त केलें । ३ ।
नामा म्हणे तुझे पायीं संजीवन । सदाशिव ध्यान तेंचि करी । ४ ।

१९०३. चारी वेद गाती जयासी अखंड । नेणवे प्रचंड कीर्ति ज्याची । १ ।
तोचि भीमातीरीं उभा दिगंबर । ठेवी कटीं कर भक्तांसाठीं । २ ।
युद्धीं अर्जुनातें सांगितली गीता । सहस्रशा कांता केल्या ज्यानें । ३ ।
नामा म्हणे शिवा दिले शिवपण । ब्रह्मया लागोन उपदेश । ४ ।

१९०४. विश्वाच्या मोहना कपट नाटका । पंढरीनायका पांडुरंगा । १ ।
अवतार धरूनि होऊनि निमित्त । बुजविसी दैत्य सर्पखाणी । २ ।

गोपिकांचे घरीं कामासी लंपट। करिसी धीट गवळियांसी। ३।
भाव अभावाचा न करी कंटाळा। दावी बाळलीला म्हणे नामा। ४।

१९०५. सर्वांभूतीं नांदे सर्व नारायण। सर्व संस्थापन पांडुरंग। १।
अगा देववंद्या अगा गोपवेशा। पावन परेशा परमार्थासी। २।
मूर्त अमूर्ताच्या मुक्त परांगता। सर्व मायातीता साक्षिरूपा। ३।
नामा म्हणे देवांदानवां जिंकिसी। ते भाके आम्हांसी सांभाळावें। ४।

१९०६. देऊनि भातुकें गळां घाली मिठी। सखा जगजेठी भक्ती भावा। १।
आधार करोनि राहिले पंढरीं। तेथें निरंतरीं प्रेम दावी। २।
नामा म्हणे सेवा करोनियां शुद्ध। संसार संबंध नाहीं तया। ३।

१९०७. हरि गातां बरवा ऐकतां बरवा। हृदयीं ध्यातां बरवा बाइयांनो। १।
केशव पैं देणें केशव पैं घेणें। केंशव करणें धंदा आम्हीं। २।
चंद्रबिंबाची कुरवंडी ओवाळूं श्रीमुखावरी। मदन हा जिव्हारीं लाजिन्नला। ३।
नामा म्हणे निववि‍लें सकळ इंद्रियांतें। म्हणोनि त्या केशवातें शरण जावे। ४।

१९०८. वेदासी कानडा श्रुतीसी कानडा। विठ्ठल उघडा पंढरीये। १।
नाम बरवें रूप बरवें। दर्शन बरवें कानडीयाचें। २।
नामा म्हणे तुझें अवघेंचि बरवें। त्याहूनि बरवें प्रेम तुझें। ३।

१९०९. निर्धन धनातें कीं आंधळे लोचनातें। मयूर घनातें जेंवि भावी। १।
पारधियें पाडस धरियलें वनीं। तें चिंती जननि रात्रंदिवस। २।
तैसा तुझा छंद लागो कां गा देवा। माझिया बा जीवा केशिराजा। ३।
सर्पे डंखिलें तें स्मरतो गारोडी। पुरीं जातां सांगडी मन चिंती। ४।
रोगी वैद्यातें बोलावूं धाडी। पडिले बांदवडी सुटका इच्छी। ५।
बोळविली बाला ते मनी वाहे कुवसा। कां रसज्ञु जैसा ओषध गिवसी। ६।
धेनुकारणें व्याकुळ होय वत्स। तें दशदिशेस अवलोकितें। ७।

निचेतन देह प्राण असे अलक। धायवट उदक स्मरे वनीं। ८ ।
चकोरें मिळोनि चंद्रा जेंवि ध्याती। इंद्रिया निवृत्ति कैं होईल। ९ ।
पक्षिणीचें पिलू येऊनि द्वाराजवळें । मुख पसरी कोंवळें अलोहित। १०।
नामा म्हणे म्यां आन नाहीं जाणितलें। मज पुरे इतुलें केशिराजा। ११।

१९१०. सर्व पाप पुण्य हींचि दोन्ही भांडीं। विवेक न सांडीं येतां जातां। १ ।
तुझें नाम तारूं तुझें नाम तारूं। तुझें नाम तारूं श्रीविठ्ठला। २ ।
विष्णुदास नामयानें उभारिली शिडी। ठाकावया पेढी वैकुठींची। ३ ।

१९११. सगुण संपन्न पंढरीच्या राया। आमुच्या स्वामिया केशिराजा। १ ।
रामकृष्ण हरी श्रीधरा मुकुंदा । सज्जनीं स्वानंदा सर्वातीता । २ ।
गोविंद गोपाळ गोपवेषधारी। गोवर्धन धरी नखावरी। ३ ।
दुष्ट दुर्जनासी दुःख फार चित्तां। पावन पतितां नामा म्हणे। ४ ।

१९१२. चिंतातुर देहीं न साहे काजळी। मनाची पाजळी उभय दिवीं। १ ।
प्रकाश पडेल ब्रह्म हें दिसेल। वैकुंठ जोडेल भजनभक्तीं। २ ।
नाहीं यातीवर्ण नाहीं या व्युत्पत्ती। नामेंचि संतृप्ति होती जीवा। ३ ।
नामा म्हणे नाम हेंचि बीजसार। तुटेल येरझार भवबंधाची। ४ ।

१९१३. गोक्षीर लाविलें अंधळिया मुखीं। तेथील पारखी जिव्हा जाणे। १ ।
तैसें देवा तुझें नाम निरंतर। जिव्हेसी पाझर अमृताचे। २ ।
सोलुनियां केळें साखरें घोळिलें। अंधारीं खादलें तरी गोड। ३ ।
द्राक्षफळां घड सेवितां चोखड। तयाहुनि गोड नाम तुझें। ४ ।
आळुनियां क्षीर तुपाचिये आळें। कालविलें गुळें गोड जैसें। ५ ।
जाणोनियां नामा करी विनवणी। अमृताचि खाणी नाम तुझें। ६ ।

१९१४. नामचि हें आहे पंचतत्त्वां ठाव। नाहीं दुजा भाव देखावया। १ ।
देखणारा जाहाली कर्पुराची वाती। नामाग्नि विश्रांती ठाईं जाहाली। २ ।

द्वैताद्वैत तेथें नेणों जाणपण । गेले हरपोन नामें सर्व । ३ ।
नामदेव म्हणे अनाम तें नाम । नाना नामभ्रम तेथें दुजा । ४ ।

१९१५. जन्मजन्मांतरीं असेल सामोग्री । तरिच नाम जिव्हाग्रीं येईल राम । १ ।
कर जोडूनि दोन्ही मोक्ष पाहे वास । म्हणे होईन दास हरिदासांचा । २ ।
तरि हें तुच्छ करूनि न पाहती दृष्टी । आपंगिलें शेवटीं ब्रह्मज्ञानीं । ३ ।
नामाचेनि बळें उडविलीं साधनें । तोडिलें बंधनें संसाराचीं । ४ ।
मुक्तिपद कोणी न घेती फुकासाठीं । हिंडे वाळवंटीं दीनरूपें । ५ ।
योगियांचें घर रीघे काकुलती । अव्हेरिलें संतीं म्हणोनियां । ६ ।
रिद्धीसिद्धी म्हणती आमुची कवण गती । यावें काकुलती कवणा आम्हीं । ७ ।
मोक्षमुक्ति जिहीं हाणितल्या लाथीं । ते काय धरिती आमुची सोय । ८ ।
ऐसें सर्व देवांसी श्रीदेव ते पुज्य । केलें एक राज्य पुंडलिकें । ९ ।
हर्षें निर्भर नामा नाचे महाद्वारीं । मुखीं निरंतरीं नामघोष । १० ।

१९१६. असत्याचे मळ बैसले ये वाचे । ते न फिटती साचे तीर्थोदकें । १ ।
हरी नामामृत प्रक्षाळी जिव्हेतें । पाणियें बहुतें काय करिती । २ ।
गंगासागरादी तीर्थें कोडीवरी । हरीनामाची सरी न पवती । ३ ।
हरीनामगंगे सुस्नात पैं झाला । नामयाजवळी आला केशिराज । ४ ।

१९१७. नामाचें सामर्थ्य नेणे वेदशास्त्र । शेषाचीं वक्त्रें मौनावलीं । १ ।
गंगा गणपति चंद्र सूर्य श्रेष्ठ । शंकर वरिष्ठ मौनावले । २ ।
भीष्म पाराशर उद्धव अंगद । ब्रह्मा मुचकुंद मौनावले । ३ ।
नामा म्हणे येरे काय जाणे स्तुति । दाटोनि श्रीपती उभा केला । ४ ।

१९१८. करीं घेऊनि ब्रह्मवीणा । नारद वोळगे नारायणा । १ ।
हेंचि हेंचि तात्त्वसार । नाम म्हणे निरंतर । २ ।
आपण शिव आणि शक्ति । रामनाम जपती । ३ ।
गात नाचत प्रल्हाद वीर । खांबीं केलासे अवतार । ४ ।

कुंटिणी पक्षिया म्हणे रामा। तिसी नेलें निजधामा। ५ ।
अहल्येसी लागतां चरण । तिसी आलें मनुष्यपण। ६ ।
अजामेळ पातकी अपार । नामें पावला पैलपार। ७ ।
गजेंद्रें केलें स्मरण । त्याचें तोडिलें बंधन । ८ ।
द्रौपदी स्मरे हृषिकेशी । वस्त्रें पुरविलीं तियेसी। ९ ।
परिक्षितीसी घडलें स्मरण । त्यासी झाले सुलभ चरण। १०।
नामा म्हणे निरंतरु । गगनीं अढळ केला धुरू। ११।

१९१९. अग्नी जाळी तरी न जळती पांडव। हृदयीं माधव म्हणोनियां। १ ।
अग्नी जाळी तरी न जळती गोपाळ। हृदयीं देवबोल म्हणोनियां । २ ।
अग्नी जाळी तरी न जळे हनुमंत। हृदयीं सीताकांत म्हणोनियां । ३ ।
अग्नी जाळी तरी न जळे प्रल्हाद। हृदयीं गोविंद म्हणोनियां । ४ ।
अग्नी जाळी तरी न जळे पै सीता। हृदयीं रघुनाथ म्हणोनियां। ५ ।
लंकेसी उरले बिभिषणाचें घर। हृदयीं सीतावर म्हणोनियां । ६ ।
नामा म्हणे स्वामी स्मरावें गोविंदा। चुके भवबाधा संसाराची । ७ ।

१९२०. नामाचा प्रताप जाणवेना कोणा। समुद्रीं पाषाणा तारियेले। १ ।
आवडीनें कोणी चिंतितां उल्हास। काय तो तयास उपेक्षील । २ ।
कुंटिणी ते नीच राव्यासाठीं नेली। वैकुंठीं ठेविली सन्निधची। ३ ।
अजामिळ खळ पुत्राचिया मिषें। उद्धरिलें त्यास दीनानाथें। ४ ।
नामा म्हणे ऐसें सांगों आतां किती। नामापाशीं मुक्ति उभा असे। ५ ।

१९२१. आणीक ही मंत्र मोक्षदानी खरे । अशौचाचा थार असूं नये। १ ।
नाममंत्र कांहीं बाधीना कोणासी। जया अहर्निशीं रामकृष्ण । २ ।
तपाची मांडणी आकाशाचें खेंव। इंद्रियांची हांव राहे तरी । ३ ।
यज्ञ तो आचार धनाचें सांकडें । तरी जाण द्वाड स्वर्गसुख । ४ ।
नामा म्हणे नाम साधकाची माता । जैसें तैसें घेतां भक्ति जोडे । ५ ।

१९२२. साराचेंही सार भक्तीचें भांडार । नाम निरंतर गातां वाचे । १ ।
कासया करावें आणिक साधन । नामाविण क्षण जाऊं नेदी । २ ।
दया क्षमा शांति हेंचि पैं भूषण । नामसंकीर्तन अहर्निशीं । ३ ।
नामा म्हणे जप अखंड नामाचा । काळ हा सुखाचा सदोदित । ४ ।

१९२३. दृश्यही होतसे आलें जें आकारा । असोनि निर्धारा नाम नाहीं । १ ।
नाम अनुभवे प्रपंचचि ब्रह्म । जाहाला सर्वोत्तम संतकृपें । २ ।
म्हणोनियां संतां जाऊनि शरण । साधावें निधान नामब्रह्म । ३ ।
नामदेव म्हणे संताचिया कृपे । माजी नाम सोपें नांदतसे । ४ ।

१९२४. नांदतसे नाम आकाश पाताळीं । सर्व भूमंडळीं घनदाट । १ ।
पाताळ फोडोनि किती आहे पुड । नाहीं आंत वाड नभ वरी । २ ।
चौऱ्यांसीं भोगिती दुर्मति पामर । नाहीं सारासार जाणत तें । ३ ।
नामदेव म्हणे नाम अविनाश । तेथें नाना वेष नाम सर्व । ४ ।

१९२५. गुरुराव गुण गंभीरवो वावो चैतन्य प्रकाशु ।
योगी सहज सुकामिनी विलासु । ध्रु० ।
चिदानंदघनु तनु सांवळावो हरि पाहातां निवती लोचन ।
तनु मन चरणीं वो गुंतलीं नाम गोपाळाचें अमृत समान । १ ।
पितांबरशेला माळ कंठीं या रावो गोपाळा ।
मुगुटीं झळाळा सर्वांगीं कस्तुरीचें विलेपन कंठी रुळे वनमाळा । २ ।
येणेंचि जन्में पाविजे गोपाळासी अनु नाही सार ।
श्रीवत्सलांछन हेचि खुण विष्णुदास नामया दातार । ३ ।

१९२६. कृपेचा कोंवळा रघुनाथ दास । धरीन त्याची कास सर्वभावें । १ ।
सांडूनि सर्व संगु होईन शरणागत । करिती मनोरथ पूर्ण माझे । २ ।
भवसिंधूचा पार उतरोनि निर्धारीं । त्यापरती सोयरीं नाहीं सृष्टीं । ३ ।
अंतरींचें गुज सांगती श्रवणीं । अमृत संजीवनीं रामनाम । ४ ।

तेणें त्रिविधताप हरती मनींचे। जाणती जीवींचे झाले कष्ट। ५ ।
तो जीवलग जननी परिस लोभापरु। सर्वस्व उदारु प्राणसखा। ६ ।
नामा त्याचे बळें झेलतु यमासी। रिघोनि पाठींसी केशवाच्या। ७ ।

१९२७. संसार सागरीं रे। माझें माहेर पंढरपुरीं।
विठोबा बाप माझा। माता रखुमाई सुंदरी। १ ।
पुंडलिक भाऊ माझा। तोहि नांदे बरव्यापारी।
सासुरें दुर्बळ भारी। मज मोकलिलें दुरी। २ ।
सुख दुःख कवणा सांगूं। माझें माहेर पंढरपुरीं। ध्रु०।
भ्रतार निष्ठुर वो। काम क्रोध दोघे दीर।
आशा हे सासू माझी। ते मज गांजितसे थोर। ३ ।
तृष्णा हे नणंद सखी। तिनें व्यापियेले घरीं।
भक्ति हे माझी बहिणी। ते मज होईल निर्धारीं। ४ ।
वर्ष महिने दिवस घडिया। वाट पाहे अझुनी।
देहामाजी करिती देखा। न्यावया न पवे कोणी। ५ ।
गजेंद्र हरिश्चंद्र त्यासी। सोडावया आला।
प्रल्हाद अंबऋषि। तिहीं तुझा धांवा केला। ६ ।
उपमन्यु दूध मागतां। क्षीरसागरु दिला।
गजेंद्र अजामेळ। त्यांच्या सत्वा तूं पावला।
नामया विष्णुदास। गीतीं गोविंदु गाइला। ७ ।

१९२८. कळावंताच्या कळाकुसरी। त्या मी नेणें गा श्रीहरी। १ ।
वारा धांवे भलत्या ठायां। तैसी माझी रंग छाया। २ ।
प्रेमभातें भरलें अंगीं। तेणें छंदें नाचें रंगीं। ३ ।
घातमात नेणें देवा। नामा विनवितो केशवा। ४ ।

१९२९. भक्तिप्रतापें पावलों मी सुपंथ। सफळ निश्चित परमार्थ। १।
देव सर्वांभूतीं असतां प्रगट। निर्वाणीं चोखट भक्ति जाण। २।
धरूनियां मनीं जपसील नाम। तेणें निजधाम पावसील। ३।
जप तप ध्यान न लगे साधन। भक्ति ते कारण नामा म्हणे। ४।

१९३०. माझिया मनें मज उपदेश केला। तो मज बिंबला हृदयकमळीं। १।
निर्वाणींची एक सांगितली खूण। कैवल्य चरण केशवाचे। २।
वेदशास्त्र श्रुति आणीक पुराणें। पढोनि जाणणें हेंचि सत्य। ३।
क्रिया कर्म धर्म करणें ज्या कारणें। तें खूण निर्वाण चरण हेचि। ४।
जप तप अनुष्ठान करोनि साधन। प्रत्यक्ष निधान चरण हेचि। ५।
नामा म्हणे मज कळलें अनुभवें। न विसंबें चरण जीवें तुझे। ६।

१९३१. निर्गुण सगुण नव्हे तें समान। तैसें तेंही जाण योगाभ्यासीं। १।
प्रल्हादासी हरी शंख चक्र गदा। सगुण गोविंदा शोभतसे। २।
अर्जुनासी देव उभा पाचारासी। सखा उद्धवासी साक्ष दावी। ३।
नामा म्हणे माझा केशिराज भोळा। दावि गोपाळां बाळलीळा। ४।

१९३२. नेणे घात मात नव्हे कळावंत। शास्त्रज्ञ पंडित तोही नव्हे। १।
रंकाहूनि रंक संतांचा सेवक। मी नामधारक विठोबाचा। २।
नव्हे बहुश्रुत दाता ज्ञानशीळ। नव्हे मी वाचाळ तर्कवादी। ३।
नामा म्हणे राया विठोचा डिंगर। नामें पैलपार उतरलों। ४।

१९३३. आम्हां सांपडलें वर्म। करूं भागवतधर्म। १।
अवतार हा भेटला। बोलू चालूं हा विसरला। २।
अरे हा भावाचा लंपट। सांडुनि आलासे वैकुंठ। ३।
संतसंगतीं साधावा। धरूनि हृदयीं बांधावा। ४।
नामा म्हणे केउतां जाय। आमुचा गळा त्याचे पाय। ५।

१९३४. अवघा संसार सुखाचा करीन। अवघ्या भावें धरीन विठ्ठल एक। १ ।
अवघा शिणभाग हिरोन घेईल। अवघेंचि तोडिन मायाजाळ। २ ।
अवघा जिवलग हाचि पैं होईल। अवघा घेईल भार माथां। ३ ।
अवघा त्रिविधताप क्षणें मावळेल । अवघा चालविल योगक्षेम। ४ ।
अवघ्या संसाराचें बैसणें मोडील। अवघेंचि तोडील मायाजाळ । ५ ।
नामा म्हणे अवघी सांडीं मिथ्या भ्रांति। विठ्ठलेंविण विश्रांति नाहीं कोठें। ६ ।

१९३५. दुर्घट तें दुःख लागों नेदी भक्ता । त्याची तुज चिंता असे फार। १ ।
आणिक प्रकार घडे तो निकट। पैठणीं प्रगट रूप दावीं। २ ।
जेथुनी सत्वर निघाले स्वदेशा । मुक्त केलें महिषा मार्गीं जाण। ३ ।
जाणती प्रेमळ कीर्तनासी नर । समाधी निरंतर म्हणे नामा। ४ ।

१९३६. बाप संतसभा भली। बहुता पुण्यें जोडली ।
हृदयींचि गोवी आपुली। संतांप्रति निवेदीन । १ ।
आजि प्रसंग हरिभक्तीचा। हरि स्वभावें उच्चारु वाचा ।
विठोबा ऋणियारा भक्तांचा । ऋण फेडितो भक्तांचें । २ ।
अरे हा अनादिचा लाग करीं । अरे जन्माची उभरा भरी।
आमुचा लागिया श्रीहरि । दों उत्तरीं निवडावा । ३ ।
आतां असो हा कर्मविभागु । आम्ही मागूं आपुला लागू ।
जरि हा म्हणेल निःसंगु । तयासिं आम्हांसीं संबंध कायसा। ४ ।
जरि हा नलगे आमुचें ऋण। हातीं घेऊनि सुदर्शन।
आम्ही करूं हरीकीर्तन । तेथं तिष्टे कां उभा। ५ ।
मागें चाळविली याच रीती। परि आम्हांसि आलिया प्रचीति।
ज्यासि हरिची सोय संगती। तयासि न मने अन्य स्थळ। ६ ।
हरि कौसाळ मल्ल म्हणती। ते अवघी रे जाणवि भ्रांति।
सेवा हरिची सांगताती। संत होती हरीकडे । ७ ।

आणिक एकू आम्हांसी आठवलें। आम्हीं भांडु कारे एकले।
आमुचें केलें काय चाले। या हरिभक्तां वांचूनि। ८।
जे हरिभक्ति विरहित। त्यांचें हरिचरणीं न बोधे चित्त।
अवघे मिळूनि हरीचे भक्त। हरि व्हावा म्हणताती। ९।
आणिक एक नवल परि। जो याची सेवा करी।
त्याचें सर्वस्व हरि। आणिक श्रीहरि नाम मिरवितु। १०।
हरि आळवितां मागा उभा। आठवितां पुढें उभा।
हरि ध्यातां हृदयीं उभा। हें तंव सभा विचारा। ११।
आमुचें हो तेंच तुम्हीं विनवावें। आम्हांसि मानलें आघवें।
किती येरझारीं शिणावे। शरण रिघावें श्रीहरी। १२।
विश्व श्रीहरिचें आघवें। म्यां गाऱ्हाणें कवणासीं द्यावें।
लागे त्यासिच मागावें। हरिविण ठावो नसेचि। १३।
वीरराया पंढरिनाथा। आतां अपंगावें शरणागता।
जरी उपेक्षिसी सर्वथा। वाट कोणाची पहावी। १४।
नको नको निंदा स्तुति। हाचि भावो हेचि भक्ति।
मज नेदीं पुनरावृत्ति। विष्णुदास म्हणे नामा। १५।

१९३७. जन्ममरणाची कायसी हे चिंता। तुझ्या शरणागता पांडुरंगा। १।
वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी। असतां चक्रपाणि भय कवणा। २।
हृदयीं तुझें रूप बिंबलें साचार। तेथें कवण पार संसाराचा। ३।
नामा म्हणे तुझ्या नामाची पांखर। असतां कळीकाळ पायांतळीं। ४।

१९३८. पंढरी आनंद पाहातीये घडी। वास कल्पकोडी वैकुंठींचा। १।
आणितां अनुमाना नपवे समसरीं। महिमा न कळे थोरी सहस्रमुखा। २।
जें सुख सुरवरां स्वप्नीं नाहीं दृष्टी। तें या वाळवंटीं आम्हां तुम्हां। ३।
धन्य चंद्रभागा पुण्य सरोवर। धन्य भीमातीर पुण्यभूमी। ४।

धन्य नरनारी गर्जती जे नामीं । एकोनि डोले प्रेमीं शूळपाणि। ५ ।
धन्य वेणु नाद धन्य वृंदावन । धन्य तें जीवन क्षेत्र वासी । ६ ।
धन्य पंचक्रोसी धन्य आसपासी । गर्जती अहर्निसीं नाम घोष। ७ ।
धन्य पशुपक्षी कीटक पतंग भुजंग। जया अंगसंग पांडुरंग । ८ ।
धन्य ते तरुवर अवघे साने थोर। अवतरले सुर गुप्त रूप। ९ ।
धन्य ते संसारी अवघे जीवन मुक्त। ज्याचें कुळ दैवत पांडुरंग।१०।
धन्य त्यांचा वंश जाणोनि विश्वास। धन्य विष्णुदास नामा तेथें।११।

१९३९. जिव्हा हेचि पोथी करुनी चांगली । लिहीन नामावळी लक्ष कोडी। १ ।
गोविंद गोपाळाचा टाळ । दिसतो निर्मळ सर्वांभूतीं। २ ।
वारंवार तेंचि वाचिन सत्वर। न राहें मी स्थीर पळ लव । ३ ।
नामा म्हणे हेंचि सदा माझें काम। देणें घेणें राम कृष्ण हरी। ४ ।

१९४०. तीर्थांचें जें मूळ वृत्ताचें जें फळ। ब्रह्म तें केवळ पंढरीसी । १ ।
तें आम्ही देखिलें आपुल्या नयनीं। फिटलीं पारणीं डोळियांची । २ ।
सुरवरां चिंतनी मुनिवरां ध्यानीं। आकार निर्गुणीं तेंचि असे। ३ ।
जीवांचें जीवन सुखाचें जें सार। उभें कटीं कर ठेऊनियां । ४ ।
नामा म्हणे नाहीं श्रुति आतुडलें। आम्हां सांपडलें गीती गातां। ५ ।

१९४१. अहो दाटला सन्मुख । मागें फुडे तेंचि देख ।
ब्रह्ममय जाला हरी । सत्य दाटला मुरारी । १ ।
आतां फुटेना कीं वाट । अणुरेणुहुनि दाट । २ ।
सदा अखंड भरला । ब्रह्मरूप एक जाला। ३ ।
नामदेवाचा हो पूर । लोटे चैतन्य सागर । ४ ।

१९४२. मुळू वदनाचा उदानु नेत्राचा। अंगुळु हस्ताचा स्वामी माझा। १ ।
मुगूट जमाचा कवल्या आगळिकारी। पवित्र तळवटी चरण ज्याचे। २ ।
सेलिते भागति पोकु वेडावले । अंगुळु मुंगी झाली भक्तितया। ३ ।

ढगार वदनाचा आला वर्णावया । जिव्हा चिरलिया न कळे त्यासी। ४ ।
सद्भावे शरण आवरु जोडोनी । खेचर विसाचरणी विनटला । ५ ।

१९४३. माझे विठोबाचे श्रीमुख साजिरे । झळकती मनोहरे कुंडलेति । १ ।
मना तेची आठवी आसनी शयनी । भोगिसी उन्मनि सहजसुख। २ ।
गगनी आसफल जैसा नमे मार्तंड। तैसे अखंड करि ध्यान । ३ ।
कमळकळिके जैसे भ्रमर आसफल। तैसा तूं निश्चिंत राहे चरणी। ४ ।
जैसा का संमधु जिवन जळचरू। येणेची निर्धारु दृढ धरी । ५ ।
नामा म्हणे माझे बापाचे साधन । सांपडली खूण अंतरिची । ६ ।

१९४४. सुंदरपणे सुंदर बाप मदनाचा। तो स्वामी आमुचा पांडुरंग। १ ।
जुंझारपणे बाप सुरा असुरांचा । तो स्वामी आमुचा पांडुरंग। २ ।
सुंदरपणे बाप उदार त्रैलोक्याचा। तो स्वामी आमुचा पांडुरंग। ३ ।
चतुरपणे बाप चतुराननाचा। तो स्वामी आमुचा पांडुरंग । ४ ।
पवित्रपणे बाप पवित्र हा गंगेचा। तो स्वामी आमुचा पांडुरंग । ५ ।
नामा म्हणे बाप हरि विश्वाचा। तो स्वामी आमुचा पांडुरंग । ६ ।

## ❋ भावभक्तिप्रेमोद्गार ❋

१९४५. सर्वभावें तूं तें जे ध्याती दातारा । त्यांचिया संसारा तूंचि होसी। १ ।
ज्याचे चित्तीं नाहीं आणिक कांहीं काम। त्याचा योगक्षेम तूंचि होसी । २ ।
ऐहिक परत्र जें कांहीं देखिजे। तें तुवां होईजे मायबाप । ३ ।
नामा म्हणे माझी भक्ति हे माउली । केशवा वाहिली क्षणमात्रें। ४ ।

१९४६. धांवुनि जाईन श्रीमुख पाहीन । ईडापीडा घेईन विठोबाची । १ ।
तया सुखा दृष्टि लागेल वो झणीं। मग मी साजणी काय करूं। २ ।
म्हणोनि माझें चित्त व्यापिलें उद्वेगें। शिणलों मी उबगें जन्मोजन्मीं । ३ ।
धरोनियां घालीं जीवाचे अंतरीं। आंतोनि बाहेरी जाऊं नेदी। ४ ।

वासना पापिणी करील पायरव। मग हा अनुभव कोठें पाहूं। ५ ।
वृत्तिसहित करीन मनाचें सांडणें। न विसंबें प्राणें म्हणे नामा । ६ ।

१९४७. विठोबाचे मुख पाहातां लोचनी। पुरलिसे धणी एकसरा। १ ।
पाहावा पाहावा गोजिरा गोपाळ। नंदजीचा बाळ बाईयांनो । २ ।
गोखुरी धुरळा कुतळी शोभला। मस्तकी खोंविला मोरपत्र। ३ ।
त्रिभंगी देहुडा वाजवितो वेणु । शोभा काय वर्णू तयाचि मी। ४ ।
आनंदाचा ठेवा न माये मानसी। नामया ध्यानासी अखंडित। ५ ।

१९४८. बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले। १ ।
प्रेम सर्वांगाचे ठायीं। वाचे विठ्ठल रखुमाई। २ ।
परेहुनि परतें घर । तेथें राहूं निरंतर । ३ ।
सर्वांचे जे अधिष्ठान। तेचि माझे रूप पूर्ण । ४ ।
नाचूं कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावूं जगी । ५ ।
सर्वसत्ता आली हातां । नामयाचा खेचर दाता। ६ ।

१९४९. आम्ही तुझे असों एकचि वोळघे। नित्य परमानंदें वोसंडित। १ ।
विठ्ठलचि ध्यावा विठ्ठलची गावा। विठ्ठलचि पहावा सर्वांभूति। २ ।
या परपार न दिसे सर्वथा। केले येतां जातां गर्भवास। ३ ।
नामा म्हणे चित्तीं विठ्ठलाचें रूप। संकल्प विकल्प मावळले । ४ ।

१९५०. नामाचा गजर गर्जे भीमातीर । महिमा साजे थोर तुज एका । १ ।
रिद्धि सिद्धि दासी अंगण झाडिती । उच्छिष्टें काढिती मुक्ति चारी। २ ।
चारी वेद भाट होऊनि गर्जती । सनकादिक गाती कीर्ति तुझी। ३ ।
सुरवरांचे भार अंगणीं लोळती । चरणरज क्षिति शीव वंदी । ४ ।
नामा म्हणे देव ऐसा हो कृपाळू । करि तो सांभाळू अनाथांचा। ५ ।

१९५१. विठोबाच्या गांवा जाईन धांवोनी। घालीन लोळणी चरणांवरी। १ ।
शिणभाग दवडिला म्हणेल। जीविंचें पुसेल जडभारी । २ ।

हरुषें लोळत जाईन महाद्वारां । भेटाया सामोरा येईल मज । ३ ।
उचलोनी सीस पुसील आदरें । मुखं पीतांबरें पुसिल माझें । ४ ।
धरोनि हनुवटी उठवील हस्तकीं । ठेवील मस्तकीं अभयकर । ५ ।
राही रखुमाई माता सत्यभामा । कडे घेऊनि नामा बुझाविला । ६ ।

विठ्ठल रुखुमाई भजनाचा प्रारंभ संत नामदेवांचा आहे.

१९५२. ऐसी चाल नाहीं कोठें । नमस्कारा आधीं भेटे । १ ।
मायबाप निर्विकारी । सखा नांदतो पंढरीं । २ ।
देव भक्तपण । नाहीं नाहीं त्यासी आन । ३ ।
नामा म्हणे आधीं भेटी । मग चरणां घालीन मिठी । ४ ।

१९५३. शब्दाचें सुख श्रवणाचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें । १ ।
स्पर्शाचें सुख त्वचेचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें । २ ।
रूपाचें सुख नेत्राचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें । ३ ।
रसाचें तें सुख रसनेचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें । ४ ।
गंधाचे सुख नाकाचेनि द्वारे । माझिया दातारें ऐसें केले । ५ ।
नामा म्हणे ऐसे जयाचे उपकार । तयासी गव्हार विसरले । ६ ।

१९५४. हरिकथाश्रवण श्रवणाचेनि द्वारें । माझिया दातारें केशवें दिले । १ ।
तीर्थाचें सुख चरणाचेनि द्वारें । माझिया दातारें केशवें दिले । २ ।
पुजनाचें सुख कराचेनि द्वारें । माझिया दातारें केशवें दिले । ३ ।
नामा म्हणे ऐसे जयाचे उपकार । तो विठ्ठल दातार विसरले । ४ ।

१९५५. भक्तांचें हृदयींची जाणोनि अवस्था । आल्या शरणागता लोभापरु । १ ।
संतां पुसे माझा दाखवा रे नामा । तुम्हां समागमा खेळे सदा । २ ।
दृष्टिसीं दाटलें कृपेचें भरितें । म्हणे तें आवडतें केउतें गेलें । ३ ।
निरंजलें नयनीं कोमायिलें वदनीं । आणा रे गवसुणी आळीकर । ४ ।
तंव वाट पाहात होता परलक्षीं । भेटी देऊनि सुखी केला देवें । ५ ।
नामा म्हणे विठो माझा सुखराशी । झणीं दूर जासी हृदयींचा । ६ ।

१९५६. अठ्ठावीस युगें उभा चंद्रभागे। परी पालटची नेघे पांडुरंग । १ ।
उभा उगेपणें पुंडलिकाचेनी सुखें। आहे तेथें लक्षें जैसा तैसा । २ ।
प्रेम रसरंगें प्रीतीचेनी पांगें । सदां संतसंगें खेळ करी । ३ ।
जो नलभे योगें यागें आणि देहत्यागें। तो सांपडला सर्वांगें हृदयीं धरा। ४ ।
धुंडाळितां श्रुतिस्मृति जो नुमगे। तो भक्ता साहे मागें सांभाळीत। ५ ।
योगियांच्या ध्यानीं क्षणएक न रंगे। तो सुखी गोष्टी सांगे नामयासी। ६ ।

१९५७. प्रल्हादादिकांचें अंतरींचें ध्यान। तें पंढरीये निधान उभें असे । १ ।
सर्व जन जया नेणते जाहले। सुख दाखविलें पुंडलीके । २ ।
वेदांचें जें सार श्रुतींचें जिव्हार। तेंचि कटीं कर उभें असे। ३ ।
ज्ञानाचें जीवन वैराग्या भूषण। तें सुख निधान विटेवरी। ४ ।
शुद्ध बुद्ध मुक्त समाधीचें सुख । तें उभें प्रत्यक्ष वाळवंटीं। ५ ।
हृदयीं धरूनि नामा निजबोधें निमाला । शिण हारपला संसाराचा। ६ ।

१९५८. कैवल्याचें भरतें आलें भीमातटा। परब्रह्म चोखटा कोंदाटलें। १ ।
घ्यारे घ्यारे तुम्ही सुखाचें फुकाचें। पाय विठोबाचे हृदयीं धरा। २ ।
लोटला क्षीरसिंधु आला हो संगमा। देखोनि भुलला प्रेमा पुंडलिकाच्या । ३ ।
पृथ्वीचीं तीर्थें झालीसे मलिनें । व्हावया पावनें येथें आलीं। ४ ।
ऋषीमुनी गंधर्व शुक सनकादिक। पातले प्रत्यक्ष सुखालागीं। ५ ।
नामा म्हणे वेगीं ठाकारे पंढरी । प्रेम सुख लहरी तेथें आहे । ६ ।

१९५९. चित्रकारें पुष्पमाळा लिहियेली। परिमळ तो लिहितां नये रे। १ ।
शशिसूर्यबिंब अवघें लिहितां येईल। प्रकाश तो लिहितां नये रे । २ ।
संन्याशाचें सोंग अवघें येईल । वैराग्य तों आणितां नये रे । ३ ।
ज्याचें रत्न हारपतां तया न गवसतां । हानीची चिंता मानूं नये रे । ४ ।
नामा म्हणे करणी करों येईल । विठोबाचें प्रेम आणितां नये रे । ५ ।

१९६०. चरण ध्याऊं तरी चरण पाताळीं। हृदयकमळीं केवीं राहे । १ ।
रूप ध्याऊं तरी वेदां अगोचर । वर्णितां साचार केंवि होय। २ ।
नाम ध्याऊं तरी अनंत गुणनाम। त्याविण परब्रह्म पाविजेना। ३ ।
तीर्थे हिंडिजे तरी भूमि नव खंड । आयुष्य उदंड नाहीं मज। ४ ।
धर्म करुं तरी न तुटे हे तृष्णा। संसार बंधन केवीं तुटे । ५ ।
नामा म्हणे केशवा अघटित घडे । जन्म मरण कोडें घालिसी झणीं। ६ ।

१९६१. जतन करावया उभा विटेवरी। तळवटीं पंढरी वोढवली । १ ।
तिहीं लोकीं पिकला जगज्जीवन। प्राप्त पाहुनि देतसे । २ ।
चातक चिंतनीं जळधर गगनीं । पुढारला मुनी पुंडलीक। ३ ।
विष्णुदासनामा विनवी वेळोवेळां। प्रेमजीवनकळा मुराली । ४ ।

१९६२. कमळगर्भ मनीं थोर चिंता करी । पद्मठसे वरी उमटताती। १ ।
नीलोत्पल जैसें चरण वानूं कैसे । सकुमार राजस विठ्ठलाचे। २ ।
लावण्यसागरु रूप पाहों ठेली । दृष्टी पैं खुंटली रुक्मिणीची। ३ ।
नामा म्हणे विठोचे चरण सकुमार। तेथें वाहे धार गंगादेवी। ४ ।

१९६३. परब्रह्ममूर्ति सांवळें सगुण। पंढरी निधान वाळुवंटी। १ ।
आनंद अमृत बोळला दरुशनें। तुटेल बंधन हेळामात्रें । २ ।
नामा म्हणे असो नामीं सदा मन। उभा नारायण भेटी पुरे। ३ ।

१९६४. शांति भीमातीरीं भक्ति पंढरपुरीं। प्रेम विटेवरी देखियलें। १ ।
देखिलागे माय देखिलागे माय। देखिलागे माय पंढरीये। २ ।
नामा रूपातीत नित्य सदोदित। जेथें विरे चित्त योगियांचें। ३ ।
दुरी ना जवळी त्रिपुटी वेगळा। केशव भेटला नामा म्हणे। ४ ।

१९६५. ध्यान धारणा नलगे टाळी। विठो पाहावा उघडे डोळीं। १ ।
विठो समाधीचें सुख। पाहतां हरे तहान भूक। २ ।
नामा म्हणे न करीं कांहीं। चित्त रंगलें हरीचें पायीं। ३ ।

१९६६. हरिसी शरण रिघा वहिलें। राहे कळिकाळ उगलें। १।
खंडलें एका बोलें। विठ्ठल समर्थें अंगिकारिलें। २।
नामयानें संसारा जिंकिलें। केशव चरणीं मन ठेविलें। ३।

१९६७. केशव पैं मुक्ति केशव पैं भक्ति। केशव विश्रांति पंढरीये। १।
केशव लौकिकीं केशव व्यवहारीं। केशव निर्धारीं नाम तुझें। २।
नामा म्हणे आम्हा केशव वोळला। भावासि भुलला वाळवंटीं। ३।

१९६८. हरिहर ब्रह्मा इंद्रादिकां देव। इच्छिताती केशवा पायधुळी। १।
यावरी गोपाळ आनंदें नाचती। भूषणें श्रीपति शोभायमान। २।
पाहोनियां सुख आले सर्व देव। पंढरीचा राव पाहावया। ३।
नामा म्हणे मिषें गोपाळकाल्याचे। निरंतर वाचे घेत नाम। ४।

१९६९. पंढरीस जावें जीवन्मुक्त व्हावें। विठ्ठला भेटावें जिवलगा। १।
कायावाचामन चरणीं ठेवावें। प्रेमसुख घ्यावें सर्वकाळ। २।
सुखाचें साजिरें श्रीमुख पहावें। जीवें उतरावें निंबलोण। ३।
बाहेरी भीतरीं कैवल्य आघवे। वाचे न बोलावें ब्रह्मानंदु। ४।
चिरंजीव नामा कंठीं धरी प्राण। करी तुझें ध्यान रात्रंदिवस। ५।

१९७०. विचारूनि पाहा पंढरिचें पाडें। सुख होय थोडें क्षीरसिंधू। १।
सांडूनि वैकुंठ आले जगजेठी। वस्ती वाळवंटीं केली जाण। २।
भक्त साहाकारी ब्रीदें बडिवार। सेवा सुखसार पांडुरंग। ३।
जीवींचे सोयरे न मिळे वैकुंठीं। हरिदासा भेटी आडलिया। ४।
प्रीतीचे वोरसे उभा मागें पुढें। जीवासी आवडे भक्त राणा। ५।
लक्ष्मीचा विलासी न वाटे विश्रांती। आवडे श्रीपति भक्तभावा। ६।
सगें सर्वकाळ धांवे पाठोवाटी। घाली कृपादृष्टी तयावरी। ७।
अमृत सुरस नव्हेचि पैं गोडी। म्हणोनि आवडी काल्याची। ८।

हरुषें निर्भर सुरवरा खेळे। वाळवंटीं लोळे संतसंगें । ९ ।
अठ्ठावीस युगें उभा विटेवरी। भक्तप्रिय हरि स्वामी माझा । १० ।
नामा म्हणे त्याचे सुखरूप पाय। क्षणेक न होय जीवाहुनी । ११ ।

१९७१. पुंडलिकें रचिली पेंठ। संत ग्राहिक चोखट। १ ।
प्रेम साखरा वांटिती । नेघे त्यांचे तोंडीं माती । २ ।
समतेचे फणस गरे। आंबे पिकले पडिभरें । ३ ।
नामद्राक्षाचे घड। अपार रस आले गोड। ४ ।
नामा म्हणे भावें घ्यावें। अभक्तांचें मढें जावें। ५ ।

गोपाळकाल्याचा प्रारंभ संत नामदेवांचा आहे

१९७२. माझिया भक्तां जे ठेविती दूषणा। तुटोनी रसना पडेल त्यांची। १ ।
ऐसे दुराचारी असती जे नर । भोगिती अघोर सत्य जाणा। २ ।
माझिया भक्तां जे करती छळण बुद्धि । त्यांची वंशवृद्धि नव्हे कदा । ३ ।
माझिया भक्तांचा करिती उपहास। त्यांचा समूळ वंश यमलोकीं। ४ ।
केशव म्हणे नामया बोलिलों सत्यवाणी । लटीकें म्हणेल पतनीं पडेल पापी। ५ ।

१९७३. हरिनाम गातां पवित्र। सेविती हरिहर ब्रह्मादिक। १ ।
नाम तारी नाम साहाकारी । नामें उच्चारी रूपें तुझीं । २ ।
ऐसीं अनंत नामें तुझीं न वर्णवती देवा । नामा म्हणे केशवा विनवितसें। ३ ।

१९७४. अनाथाचानाथ दीनाचा दयाळ। भक्तांचा कृपाळ पांडुरंग। १ ।
येगा तूं विठ्ठला माझिया माहेरा। कृपेच्या सागरा पांडुरंगा। २ ।
वर्णिती पुराणें न करीं लाजिरवाणें । बोलती वचनें सनकादिक । ३ ।
कृपेचा सागरु कैवल्य उदारू। रखुमाईचा वरु पांडुरंग। ४ ।
पुंडलिकाचे भेटी अससी वाळवंटीं। हात ठेवुनि कटीं विटेवरी। ५ ।
भक्तिलगीं कैसा उभा असे तिष्ठत । असे वाट पहात भीमातीरीं । ६ ।
येऊनि जन्मासि पहावी पंढरी । तेणें भवसागरीं तरसील । ७ ।
नामा म्हणे मज हरीचा विश्वास। झालों असें दास जन्मोजन्मीं। ८ ।

१९७५. जनीवनी अवघा देखे जनार्दन। नित्य हे वचन राम नाम। १ ।
खुंटतिल योनी तुटतील यातना। भक्ति नारायणा पावेल तुझी। २ ।
स्मरेल सदा काळे न लागती पाल्हाळे। सर्वत्र गोपाळ वसिजे सदा। ३ ।
नामा म्हणे ब्रह्म सर्वमय हरि। येक चराचरी जनार्दन। ४ ।

१९७६. आम्हासी हो नाही आणिक प्रमाण। नामासी कारण विठोबाच्या। १ ।
घालोनियां कास करितो कैवाड। येवू नेदि आड कळीकाळासी। २ ।
अबद्ध वाकुडे गावू कैसे तरी। वाचे नाम हरी उच्चारण। ३ ।
नामा म्हणे निकी सापडली सोय। न सोडी मी पाय केशवाचे। ४ ।

१९७७. केशव पुसे नामयासी। तुझी नांदणूक कैसी। १ ।
आम्हां काय उणें काय उणें। तुझेनि धर्में दातारा। २ ।
तुम्हां घरीं बोचकें लुगडीं। आम्हां घरीं पोरें उघडीं। ३ ।
तुम्हां दुर्ग दारवंटा। आम्हां घरीं बारा वाटा। ४ ।
तुम्हां घरीं गाई म्हैशी। आम्हां घरीं उंदीर घुशी। ५ ।
तुम्हां घरीं बटकी दासी। आम्हां घरीं आहेत लांसी। ६ ।
तुम्हां घरीं शेजा बाजा। आम्हां घरीं तृण शेजा। ७ ।
तुम्हां घरीं सुवर्ण मडकीं। आम्हां घरीं खापरें फुटकीं। ८ ।
तुम्हां घरीं लेंकुरें वाडें। आम्हां घरीं तुळशी झाडें। ९ ।
नामा म्हणे तुमचे घरीं सोनें दाम। आमुचे घरीं तुमचें नाम। १०।

१९७८. अपराधी तरी केला अंगिकार। कासया विचार तुज माजी। १ ।
लोहो होतें परि परिस संगति। तैसा तूं श्रीपती जगामाजी। २ ।
घुसळितां रवी नेणें लाभ हानी। तैसें चक्रपाणि होऊं नये। ३ ।
हीन दीन सर्व तुझाच आधार। नामा म्हणे सार हेंचि आतां। ४ ।

१९७९. अविनाश वस्तु स्वयंभु संचली। ऐसी तैसी बोली साहिना त्या। १ ।
वर्णिता लागेनाचि पार। झाला तदाकार अनुभवें। २ ।

मौन्य रूपें तेणें दाखविली खुण। दिसेना आपण दुजेंविण। ३ ।
घेऊं लागे नाम झाला लज्जित। बोलताती संत ब्रह्म असे। ४ ।
नामदेव म्हणे ब्रह्म तें अब्रह्म । त्या नामीं निमग्न नाना झाले। ५ ।

१९८०. हें कोणाचें महिमान । पाणियाचें मोतीं होणें। धृ०।
अहो पडतां नीरबिंदु । मुक्त मोती होय सिंधु । १ ।
शिळेमाजी हो दर्दुरी । अन्नोदक दिलें हरि। २ ।
नामयाचें ब्रह्मज्ञान । अवघ्या सत्तेचें महिमान। ३ ।

## ❀ नाटाचे अभंग ❀

१९८१. विठ्ठल विसांवा सकळिकां। विठ्ठल आधार तिही लोकां।
विठ्ठल नकळे ब्रह्मांदिकां । विठ्ठल देखा पंढरीये। १ ।
विठ्ठल डोळस सांवळा । विठ्ठल पाहाती अबलाबाळा।
विठ्ठल ध्यावा वेळोवेळां। विठ्ठल कमळावल्लभ। २ ।
विठ्ठल धरारे मानसीं । विठ्ठल सोडवील अहर्निशीं।
विठ्ठलावीण मुक्ती कैंची । कुंटणी गणिकेसी उद्धरिलें। ३ ।
विठ्ठल उभा भीमातिरीं । कर ठेवुनि कटावरी।
विठ्ठल भक्तकाज कैवारी । विठ्ठल हरी महा दोष। ४ ।
विठ्ठल अनाथा कोंवसा । विठ्ठल नुपेक्षी भरंवसा ।
विठ्ठलेविण शून्य दाही दिशा । विठ्ठलाविण नाहीं हे अनेक। ५ ।
श्रीविठ्ठल धन्य दिवस। श्रीविठ्ठल भक्तिरस ।
श्रीविठ्ठल परम पुरूष। विष्णुदास म्हणे नामा। ६ ।

१९८२. देवा दिवस गेले वायांविण। हरिसी न रिघतां शरण।
बाळकत्व अज्ञानपण । तै आठवण नव्हेचि। १ ।
आला तारूण्याचा अवसरू । सर्वेचि विषयाचा पडिभरू।
काम क्रोध मदमत्सरू । अति व्यापारू तृष्णेचा। २ ।

सर्वेचि वृद्धत्व पातलें । सकळ इंद्रियें सांडियलें।
देह न करी म्हणितलें । अंतर पडलें भक्तीसी । ३ ।
देवा हित कांहीं नव्हे माझें। दास्यत्व न घडेचि तुझें।
आयुष्य गेलें वांया काजें । धरणिये ओझें पैं झालें। ४ ।
पुनरपि जन्मा येणें मागुता । कवण जाणे कैसी व्यवस्था।
कैसा देह लाधेल अनंता। केव्हां तव चरणीं येईल । ५ ।
आतां मज करूं नको उदास । तुझिया नामाचा विश्वास ।
हृदयीं नांदे हृषीकेश । विष्णुदास म्हणे नामा। ६ ।

१९८३. मज चालतां आयुष्यपंथें। तारुण्यवन पातलें तेथें ।
मदमत्सरादि श्वापदें बहुतें। आलीं कळकळीत मजपाशीं । १ ।
तीं धांवती पाठोपाठी । पाहें तंव विषयाचे घाटीं।
काम क्रोध व्याघ्रांची दाटी । देखोनि पोटीं रिघाले पाय । २ ।
मग स्वधर्ममार्गीं रिघालों। तंव अहंकारतस्करें आकळिलों ।
राहें राहें म्हणोनि उभा केलों । तेणें अंतरलों स्वामिया। ३ ।
जंव क्षण एक उघडिले डोळे । पाहें तव कंठ व्यापिला व्याळें ।
मायामोहसर्पीं डंखिलें । त्यांचिये गरळें झळंबलों। ४ ।
जंव न पवे शेवटील लहरी । तंव धांव उपाव करीं ।
विष्णुदास नामा धांवा पुकारी । माझी कैवारी केशिराज । ५ ।

१९८४. तुज नेणों गा महेशा । म्हणुनि आलों गा गर्भवासा।
अंध कूपीं पडिला जैसा । रात्रिदिवसा तो नेणे । १ ।
तुझिया नामाची सांगडी । अखंड देई ते न खंडी।
पावेन मी पैलथडी। त्या सांगडी आधारे। २ ।
कामक्रोधादि जळचरीं। कासाविस जालों भारी ।
व्याकुळ होय चिंतालहरीं । दुःखें भारी दाटलों। ३ ।

कल्पना व्याळी गुंडाळिलों पायीं। तेणें बुडालों विषयडोहीं।
भवतें पाहें तंव कोण्ही नाहीं। मग तुज ध्यायीं विश्वेशा।४।
मज बांधुनी कर्मदोरी। घातलें संसारदुर्धरीं।
मायानदीच्या महापुरीं। वाहावलों गा दातारा।५।
ऐसा खेद क्षीण जालों बहुवस। न देखें विश्रांतीची वास।
विनवी नामा विष्णुदास। गर्भवास पुरे आतां।६।

१९८५. देवा तुझी अवज्ञा घडे। तयाचे दांत होती वांकुडे।
व्याधिविण देहीं पीडे। बुडे सागरीं चिंतेच्या।१।
देवां तूं होसी उदासीन। तरी हांसती सकळ जन।
जेथें जाय तेथें होय अनमान। जगाधीन होऊनि ठाके।२।
देवा तूं नाहींस जयाचे चित्तीं। सोनें धरिल्या होय माती।
पीक न पीके तयाचे शेतीं। पेंवीं पाणी निघतसे।३।
सेवा करी जयाचे घरीं। तींचि होतीं पाठमोरीं।
इष्टमित्र सज्जन सोयरीं। आप्त वैरि होऊनि ठाके।४।
पाय ठेविला चुके आपण। मागतोचि मागे जाण।
सत्यास घडे आपदास्थपण। बोल तितुके लटिकेचि।५।
ऐसा अनुभव घडला मज। म्हणोनि बा शरण आलों तुज।
नामा म्हणे केशीराज। कृपा करीं दातारा।६।

१९८६. देवा छळें पाप कांपते मेदिनी। षट्कर्मे सांडियेलीं ब्राह्मणीं।
दैत्यांचेनि भारें दाटली अवनी। प्रथम चरणीं कलियुगीं।१।
लटिक्याचा साच जिंकियेला कली। पाखांडी वेदातें न मानिती बळी।
अधर्म प्रवर्तला महीतळीं। ऐसीं पापें कळीं थोर झालीं।२।
म्हणोनि करूणा भाकितु आहे। जैसी व्याघ्रें वेढिली गाये।
तेंवि पंचानन ग्रासूं पाहे। तैसे दिसती नारायणा।३।

भक्ति भावो नावडे पैं गा । जैसें कां अमृत मुखीं भुजंगा।
डंख करूं आवडे जगां। ऐसें श्रीरंगा नवल चोज। ४ ।
भ्रतारभक्ति सोडियली नारीं। परपुरूषीं मन निर्धारीं।
पितियासि पुत्र असों नेदी घरीं। नित्य निंदा करी अपमान। ५ ।
म्हणोनियां जिवें त्रासु घेतला। सत्य लोपलें धर्म बुडाला।
अझूनि काय पाहतोसि उगला। धांवें विठ्ठला म्हणे नामा। ६ ।

१९८७. वेदांवेगळें कर्म करी। मनीं पाखंड धरी।
तो पचिजे अघोरीं। चिरकाळ वरी। १ ।
तो न आणावा पैं दृष्टी। तोचि दोषी एक या सृष्टी।
तो होईल महा कष्टी। हरीसि न भजतां। २ ।
संध्या स्नान नेणे दान। नेणे हरिकथा श्रवण।
तोहि पतीत जाण। महापातकी चांडाळ। ३ ।
सांडूनि ब्राह्मणपण। शूद्ररीती आचरण।
तो दृष्टी पडलिया जाण । महादोष घडेल। ४ ।
निंदा करी जो संतांची। पूजा नेणे जो देवाची।
तोचि राशि पापाची। प्रत्यक्ष जाणावी। ५ ।
तीर्थ न करी हिंडतां। व्रत न करी बोलतां।
पुराण नायके पाहतां । तो तंव राक्षस जाणावा। ६ ।
सदा अमंगळ अशुची। गुरु आज्ञा भंगी साची।
अखंड निंदा करी संतांची। तो स्वामिद्रोही जाणावा। ७ ।
कपट शिके नानाविध। गोत्रजांशीं करी विरोध।
तो जाणावा हें प्रसिद्ध। महापातकी चांडाळ । ८ ।
गृहदारावरी नाहीं चित्त । परस्त्रियेसीं करी स्तुत।
तो प्रत्यक्ष महा दैत्य। त्यांचें मुख पाहों नये। ९ ।

नाठवी जो उपकार। स्वामीसी न करी जो नमस्कार।
तो जन्मांतरींचा होय नर। पतीत चांडाळ बोलिजे। १०।
पाखांड रची कवित्व । माता पितियाचें न करी महत्व।
पंच पातकी जीवित्व। तो पूर्वीचा बोका होता। ११।
नामा म्हणे तैसे दोषी। न आणावे पंढरीसी ।
काय करावे ते पाषाण जन्मासी। जे विठ्ठलनामासी मिळतीना। १२।

१९८८. यम सांगे दूतां। तुम्हीं जावें मृत्युलोका।
आपुलाला लोक जितुका । तितुका आणावा। १।
तुम्हां सांगतों कुळरंग। निंदा द्वेष करिती राग।
खरी खोटी चहाडी सांगे। तें कुळ आपुलें। २।
ज्यांचें विषयावर ध्यान। परद्रव्य परस्त्री गमन।
धर्मासी विन्मुखपण। तें कुळ आपुलें। ३।
भावेंवीण भक्ति करिती। भक्तिवीणें भाव दाविती।
त्यांची तुम्ही फजिती। बहुतां प्रकारें करावी। ४।
मंत्रसंचारी जे लोक। देव सांडून देवताउपासक।
झोटिंग वेताळ खेताळ देख। ते सखे बापा तुमचे। ५।
ळटिके वासनेच्या नवसा। करिती करविती पशुहिंसा।
यानें बहुत दिवस भरंवसा। धरिला आहे। ६।
ग्रातकी पातकी गुरूद्रोही। हित सांगतां गुरूसी हेडवी।
वेष्णुदासावेगळें करून पाहीं। सांगितले तितुके आणावे। ७।
ामा म्हणे एक्या पातकीयां दंडिती। नाना विपत्ति काय सांगूं किती।
वेष्णुदासाचे वंदिती। चरणरज ते यम। ८।

:९८९. अरे मना तूं मर्कटा। पापिया चांडाळा लंपटा।
रद्वार हिंडसी सुनटा। अरे पापी चांडाळा। १।

अरे तुज पापावरी बहुगोडी। देवधर्मी नाहीं आवडी।
तेणें न पावसी पैल थडी। कर्म बांधवडी पडसील। २ ।
अरे तूं अभिलाषिसी परनारी। तेणें सिद्धपंथ राहेल दुरी ।
जवळी येईल यमपुरी । आपदा पावसील। ३ ।
आतां तुज वाटतसे गोड । अंतकाळीं जाईल जड।
महादोष येति सुखा आड । करितील कईवाड यमदूत। ४ ।
माझें शिकविलें नाइकसी । आतां सांगेन बळिया केशवासी ।
धरूनि नेईल वैकुंठासी। चरणीं जडसी म्हणे नामा। ५ ।

१९९०. नानापरिची दैवतें। बहुत असती असंख्यातें।
सेंदुर शेरणी जीं इच्छितीं । तीं काय आर्त पुरविती। १ ।
अंध नको होऊं आलीया । भजे भजे पंढरिराया ।धृ०।
सोडूं नको विष्णु त्रिरात्र पारणिया। तोंडी कुलूप पाठी गळ टोचोनियां। २ ।
बाळा अबळा मुकी मौळी । क्षुद्र देवता जीवदान बळी ।
तेणें न पावती सुख कल्लोंळी। एक विठ्ठलावांचूनियां। ३ ।
नाना धातूची प्रतीमा केली। षोडशोपचारें पूजा केली।
दुकळी विकूनि खादली । तें काय आर्त पुरविती। ४ ।
आतां दृढ धरोनियां भाव। वोळगा वोळगा पंढरीराव।
आपुले चरणीं देईल ठाव । विष्णुदास नामा म्हणे। ५ ।

१९९१. अर्चन विष्णूचें नाहीं पूजन। तये गांवींचे अनामिक जन ।
भूतप्रेताचें करिती भजन । तयासि दंडन करी यम। १ ।
हरीसी वंचोनि सुकृत करी। तया नांव पुण्य ठेविजे जरी।
तुटोनि पडो तयाची वैखरी। अंतीं महा घोरीं वास तया। २ ।
समारंभ करिती आणिका देवाचा। म्हणती येणें विष्णु तृप्त होय साचा।
धिग् धिग् आचार जळो त्यांचा। वांयावीण वाचा विटाळली। ३ ।

पहा हो नवही द्वारें एकेचि देहीं। रसस्वाद कान देतील कांहीं।
जयाचा मान तयाच्या ठायीं। येतसे पाहीं सेवितां। ४ ।
जो देवदेवां शिरोमणि। असुर रुळती जयाच्या चरणीं।
तो सांडिता चक्रपाणि। भजना हानी होईल तुझिया। ५ ।
विष्णुदास नामा विनवी जगा। अझूनि तरी हरीसि शरण रिघा।
जे जे अपराध केले असतील मागा। ते ते नेईल भंगा स्वामि माझा। ६ ।

१९९२. जन तुम्ही करारे उदीम। वाचे स्मरा नारायण।
तो तुम्हां चुकवील जन्ममरण। मायाभ्रमण चुकवील। १ ।
तारूं करुनी शरिराचें। केणें भरिलें हरिनामाचें।
शिड उभविलें सत्त्वाचें। वल्हें पडती धर्माचें। २ ।
आत्मयांची करुनी कुवे काठी। वारा लागतो जगजेठी।
तारूं चाले थोरा नेटी। विठ्ठल भेटी पंढरीये। ३ ।
तारवा सांपडलें बंदर। राया विठोबाचें नगर।
तें बा संताचें माहेर। विष्णुदास म्हणे नामा। ४ ।

१९९३. तो देव स्मरारे अनंत। जो कां वैकुंठींचा नाथ।
दृढ धरा रे हृदयांत। तेणें यमपंथ चुकेल। १ ।
आकांतीं द्रौपदीयें स्मरिला। तिचीं वस्त्रें आपणचि झाला।
सभेमाजी मान रक्षिला। काळ पैं झाला कौरवांचा। २ ।
विमळार्जून उन्मळिला। जरासंध तोही मारिला।
कंसासूर निर्दाळिला। कान्हया झाला गोकुळींचा। ३ ।
ध्रुव जेणें आढळपदीं बैसविला। नामें एक अजामिळ उद्धरिला।
उत्तरेचा गर्भ रक्षिला। तैं सोडविला परीक्षिती। ४ ।
जाति कुळ न पाहेची। नामें एकें उद्धरिलें गणिकेसी।
खाय त्या गोपाळाचें उच्छिष्टासी। सोडवी गजासी पाणियाडें। ५ ।

1915 संत नामदेवांची ( मराठी )—21 C

ऐसा तूं कृपाळु गा देवा। प्रसन्न झालासि पांडवा।
विष्णुदास नामा विनवी केशवा। प्रेमभाव द्यावा मजलागीं। ६।

१९९४. प्रतिदिनीं स्वधर्म करी। हरिमूर्ति नमस्कारी।
भावें भजन वसे शरीरीं। तोचि भक्त हरीचा। १।
अनंत जन्मींचे कांट। तेणेंचि केलें सपाट।
स्वधर्में करोनियां नीट। शुद्धपक्ष हरि हरि। २।
तेंचि तापसा सामर्थ्य। तेणेंचि जोडिलें तीर्थ।
त्याचे धरोनि मनोरथ। हरिभजन पथीं लागला। ३।
देवो त्याचा अंकिला। सत्वा न टळे तो कष्टविला।
अकर्मी तोचि भला। त्याचें धन्य जीवित्व। ४।
तोचि सफळ सकळीं। सदा निर्मळ सर्वकाळीं।
जो हरिनामें वाजवी टाळी। तोचि समर्थ त्रिभुवनीं। ५।
नामा हरिरंगीं रंगला। तेणें विठ्ठल संतोषला।
येऊनियां राहिला। हृदयकमळीं भक्ताच्या। ६।

१९९५. नाम जींही उच्चारण केलें। तींहीं वैकुंठ साधिलें।
भवसागर पार पावले। उद्धरले हरीभक्त। १।
नाम दुर्लभ दुर्लभ। तारील हा पद्मनाभ।
पुंडलिकें करोनियां स्वयंभ। केशव मूर्ति केली उभी। २।
ऐसें अगाध हरी रूपडें। प्रत्यक्ष पुंडलिकापुढें।
भक्ती काज कैवाडें। भीमातीरीं उभा असे। ३।
वर्णावया न पुरे शेष। वेदां न घालवे कांस।
तेथें शास्त्र काय घेती भाष। रूप वर्णावया हरीचें। ४।
उद्धव अक्रूर द्वापारीं। त्यासवें खेळले हरी।
मग उद्धरिले अवधारीं। ज्ञान देऊनि श्रीकृष्णें। ५।

नामा म्हणे ऐसें नाम । हरीकथेसी धरी प्रेम ।
तरी तुझा धन्य होईल जन्म । मनुष्य जन्मीं असतां । ६ ।

१९९६. काये करावें हें वदन । जेथें नाहीं हरिचें कीर्तन ।
काये करावे हे श्रवण । हरिचे गुण नाइकति। १ ।
काये करावे हे नयन। जे नोळखति पाप पुण्य ।
काये करावे हे करचरण। तिर्थागमन न घडेची । २ ।
काये करावें जोडलें धन । जैसे कां भुजंग रक्षण ।
काये करावें गृहस्थपण। अतीता भोजन न घडेचि । ३ ।
काये करावें योगीपण। मूळ इंद्रिया नाहीं बंधन ।
काये करावें कठिणपण । उदकीं पाषाण भिजेचिना। ४ ।
काये करावें सुंदरपण । मन मैळ कुश्चीळ तनु ।
काये करावें जाणितेपण । सर्वाभूतीं भजन जया नाहीं । ५ ।
काये करावें आयुष्यहीन। नुसतें बत्तिस लक्षण ।
नामा म्हणे तैसें भक्तिविण । केशव निधान अंतरलें । ६ ।

१९९७. नटनाटकी नारायणा । पार नाहीं तुझिया गुणां ।
कां न ये माझी तुज करूणा । दयाघना पांडुरंगा । १ ।
पडिलों मोहाच्या बांधवडीं। पायीं जडली आशा बेडी।
तुझी कीर्ती ऐसी चोखडी। घालुनि उडी सोडवी। २ ।
मार्गें तारिले अनेक। महापापी अजामेळादिक ।
आतां कां हो अलौकिक । मौन्य सुख धरिलेंसे । ३ ।
मी जरी महापापी । तुझा म्हणवितों साक्षेपी ।
येथें उपेक्षितें तथापि। ब्रीद स्वरूपीं लोपलें। ४ ।
नामा म्हणे देवाधिदेवा । भेटीस उशीर न करावा।
पुरवी माझा येतुला हेवा । ये माधवा विठ्ठला। ५ ।

१९९८. सर्व जिवां करी कारुण्य। वाचे सत्य उच्चारण।
नित्य नामस्मरण। तोचि दास भगवंताचा। १।
धन्य धन्य भूमंडळीं। धन्य धन्य साधुवचन पाळी।
वेदमर्यादा वेगळी। कार्यें न करी सर्वथा। २।
प्रात:काळीं उठुनी। नरहरिनाम उच्चारूनि।
उभा राहूनि किर्तनीं। जय जय नामें गर्जतसे। ३।
देवभक्ति आवडे ज्यासी। पुण्यप्रारब्ध म्हणती त्यासी।
जो उपजोनि आपुले वंशीं। पूर्वजांसि उद्धरितो। ४।
तीर्थें एक भावे भजन। नित्य सत्य तें पिंडदान।
भूतदया तें भागीरथी स्नान। तेथ जनार्दन उभा असे। ५।
देखिलिया ब्राह्मण। वेदांसमान देत मान।
यथाशक्ति करूनि दान। अतिथिपूजन जो करी। ६।
नामा म्हणे तोचि तरे। वैकुंठ तेथें उतरे।
तीर्थें म्हणती तो त्वरें। पाहों दृष्टी एकवेळ। ७।

१९९९. देवा तुझें मी चाटारु। सहस्रा एका हाकीं करूं।
लाभ होतसे अपारु। घडी घडीये माझारी। १।
तुझ्या पायांची जोडी। त्यासी होतसे परवडी।
आवारु न लाहे एक घडी। नंदाप्रिय होतसे। २।
मुदल पुसतसे वेळोवेळां। हा मना रे पापी चांडाळा।
सांग चोविसां आगळा। कवणेपरी न धाय। ३।
वासना मागतसे तुज। हे द्यावी जी मज।
दाटणी होतसे सहज। म्हणवोनि मज अंकीतसे। ४।
नामा म्हणे जी दातारा। तुझिये भेटी सारंगधरा।
लाभ होतसे अपारा। घडी घडीये विठ्ठला। ५।

२०००. आम्हां संगती नावडे कांहीं । म्हणोनि झालों बा विदेही ।
दु:खमूळ संगतीचें पाही । आम्ही नव्हों त्या गांवींचे । १ ।
आम्हां नाहीं रूप नांव । वस्तीसी नाहीं एक ठाव ।
मने घ्या इच्छेसि धांव । आम्ही नव्हों त्या गांवींचे । २ ।
स्नान केलें गंगातीरीं । गंध लाविलें पंढरपुरीं ।
संध्या केली कृष्णातिरीं । आम्ही त्या नव्हों गांवींचे । ३ ।
भिक्षा केली कोल्हापुरीं । भोजन केलें महाद्वारीं ।
निद्रा केली माहुरीं । आम्ही नव्हों त्या गांवींचे । ४ ।
ऐसियाची संगत करीं । त्याचे चरण हृदयीं धरीं ।
नामा म्हणे या संसारीं । आम्हीं नव्हों त्या गांवींचे । ५ ।

२००१. बोलवरी बोलती । श्रुति वाखाणिती ।
हरि पाविजे ती गति । वेगळी असे । १ ।
तुज न पावे गा तें स्वप्न । हरिशब्द एकचि ब्रह्म ।
पाविजे तें वर्म । वेगळें असे । २ ।
एक जाणीव खटपट । करिती ते सैराट ।
हरि पाविजे ती वाट । वेगळी असे । ३ ।
एक आहेत तार्कीक । चार्वाकादी वादक ।
हरि पाविजे तें सुख । वेगळें असे । ४ ।
एक चातुर्यवक्ते । व्युत्पन्न कवित्वें ।
संत रंजविते । लोकाचारी । ५ ।
जिहीं तुज जाणितलें । तिहीं मौन धरिलें ।
नामा म्हणे ते पावले । भक्तियोगें । ६ ।

२००२. साधावया स्वरूपसिद्धी । सिद्ध साधक समाधीं ।
बैसोनी ध्यान बुद्धीं । परी तो हरी न सांपडे । १ ।

धन्य धन्य वैष्णव संग । अखंड तेथें पांडुरंग ।
कीर्तनीं नाचतसे अभंग । अखंड काळ सर्वदा । २ ।
नाम घेतां धांवे विठ्ठल । न लगे तप नलगे मोल ।
कष्ट न लगती बहुसाल । हा कृपाळु दीनाचा । ३ ।
नामा म्हणे भक्तीचें कारण । भक्तीसी तुष्टे नारायण ।
याचें करितां कीर्तन । आपोंआप तुष्टेल । ४ ।

२००३. देहधर्म विहित करीं । द्वैतभाव चित्तीं न धरीं ।
सर्वांभूती नमस्कारीं । एक आत्मा म्हणोनियां । १ ।
एक तत्त्व एक हरी । एक चित्तें नमस्कारीं ।
आदि अंतींचा नरहरी । सकळ कुळासी तारील । २ ।
पवित्र त्याचे हें कुळ । आचार त्याचाचि सुशिळ ।
अखंड जपे सर्वकाळ । रामकृष्ण नरहरी । ३ ।
नामा जपे नाममंत्र । अखंड हरीनाम सहस्र ।
हाचि आमुचा निज मंत्र । रामकृष्ण गोविंद । ४ ।

२००४. तूं अवकाश मी भूमिका । तूं लिंग मी साळुंका ।
तूं समुद्र मी द्वारका । स्वयें दोन्ही । १ ।
तूं वृंदावन मी चिरी । तू तुळशी मी मंजरी ।
तूं पांवा मी मोहरी । स्वयें दोन्ही । २ ।
तूं चांद मी चांदणी । तूं नाग मी पद्मिणी ।
तूं कृष्ण मी रुक्मिणी । स्वयें दोन्ही । ३ ।
तूं नदी मी थडी । तूं तारू मी सांगडी ।
तूं धनुष्य मी भातोडी । स्वयें दोन्ही । ४ ।
तूं वेद मी स्तविता । तूं शास्त्र मी गीता ।
तूं गंध मी अक्षता । स्वयें दोन्ही । ५ ।

नामा म्हणे पुरूषोत्तमा। स्वयें जडलों तुझ्या प्रेमा।
तूं आत्मा मी कुडी। स्वयें दोन्ही। ६।

२००५. तुझें गुणनाम ऐकतां श्रवण नाराध्ये। अवलोकन करितां नयन नाराध्ये।
पूजन करितां कर नाराध्ये। ऐसी नाराणुक द्यावी कमळापती। धृ०।
नरहरि नरहरि या नामें उदंड। केव्हांही नसावें रिकामें तोंड।
खांदीं सतत वाहे करंड। मस्तकीं अखंड निर्माल्य राहे।
नेत्रीं आनंदजळ वाहे। यामध्यें देवा झणें कांहीं उणें होय। १।
तुझेनी प्रसादें जठर पोसिलें। चरणोदकें तृष्णाहरण केलें।
नामें नृत्य करितां मन हें निवालें। दंडवत घालितां श्रम हरले। २।
गतशयनीं विसर न द्यावा श्रीरामा। यापरी निश्चित परमात्मा।
तूं आलिया निवारिसी श्रमा। ऐसें केशिराजा विनवितो नामा। ३।

२००६. देवा तूं जया होसी प्रसन्न। तया नलगे कर्मबंधन।
निकें म्हणती सकळ जन। नीच लोक वंदिती। १।
तुझी दृष्टी कृपावंता। जयावरी पडे अनाथनाथा।
तया न बाधी संसारव्यथा। सर्वस्व त्याचें हरीसी। २।
माती धरिल्या होय कनक। भोग भोगिती परममूर्ख।
नाढळती महादोष। मुखीं नाम गर्जतां। ३।
धन्य धन्य ते संसारीं। पुरूष अथवा हो नारी।
दरिद्र नाहीं त्याचें घरीं। तूं श्रीहरी सानुकुळ झालिया। ४।
ऋद्धि सिद्धि द्वारीं वोळंगती। वैरी दास्यत्व करिती।
विषें अमृतें होती। तूं श्रीपति सानुकुळ झालिया। ५।
येथूनि नेसील परतें। नामा म्हणे वैकुंठातें।
लक्षा नये चहूं वेदां तें। नाना मतें धुंडाळितां। ६।

२००७. यम सांगे दूता । तुम्ही जावे मृत्युलोका ।
नमस्कार हरिभक्ता । येर निंदका आणावे । १ ।
आणूनि घाला नरककुंडी । कृमी घाला त्याचे तोंडी।
पूर्वजासहीत त्याची बुडी । अंगी सांडस लावावी । २ ।
जो न लावी गोपीचंदन टिळा । न घाली गळा तुळसी माळा ।
न जाय शरण त्या गोपाळा । त्या चांडाळ आणावे । ३ ।
आणिक एक सांगतो परी । स्त्री भ्रताराची सेवा न करी।
तिसी आणावे झडकरी । जळत खांबी बांधावी। ४ ।
आणिक एक सांगतो पाही। जो पिडील ब्राह्मण गायी।
अतिप्रीती विषयाच्या ठाई । त्या चांडाळा आणावे। ५ ।
हो का नारी अथवा नर । त्यासी द्यावा पै अनन्य मार।
विष्णुदास नामया दातार । हा बडीवार बोलिला। ६ ।

२००८. जप तप अनुष्ठान हरी । एकचि तो नमस्कारीं।
भूतद्वेष कदा न करीं । तप सामुग्री हेचि तुझी । १ ।
हरी माधव यादवा । कृष्णा गोविंदा केशवा।
येणें करोनियां जीवा । सर्वकाळ रंजवीं । २ ।
स्मरतां हरीचें नाम । पळोनि जाती काळयम।
तुटती नाना योनी जन्म । गर्भवास मग नये। ३ ।
नामा जपे नामावळी । अखंड तप हेंचि सदा काळीं।
हरिनामें पिटोनि टाळी । हाचि तरणोपाय सकळांचा । ४ ।

२००९. सर्वकाळ हरी जप । हेंचि तपामाजी तप।
न लगती घालावे संकल्प । नाना मंत्राचे परीयेसीं । १ ।
मंत्रामाजी मंत्रसार । रामकृष्ण हा उच्चार ।
नित्यनित्य निर्विकार । हरी जोडेल साचारें । २ ।

मागें कृतायुगीं सांगों । त्रेतायुगीं काय ओळगों ।
द्वापारीं कृष्ण रंगें रंगों । परी कलीमाजी नामतारक । ३ ।
नामा म्हणे ग्रंथीं । पाहे पां यथानिगुती ।
नाम जपतांचि तरती । हें व्यासाचें वचन ऐसें । ४ ।

२०१०. नाम वाचे उच्चारितां । हरे संसाराची व्यथा ।
जाती दोषाचिया चळथा । रामकृष्ण उच्चारणीं । १ ।
हरी माधव गोविंद । याची नामाचा जया छंद ।
तोचि पावेल परमपद । निजभुवन वैकुंठीं । २ ।
जन्मजन्माची तपरासी । तेणें नाम आलें मुखासी ।
स्मरतां हरी हृषिकेशी । सकळ पूर्वजां उद्धार । ३ ।
नामा जपे ध्यानीं मनीं । अखंड विठ्ठल हरी कीर्तनीं ।
तेणें जपें ये मेदिनी । कोटी यज्ञ घडले । ४ ।

२०११. अवधिया आचार निष्ठा । चित्त जरी जाय वैकुंठा ।
तरीच निस्तारिलें कष्टां । भवपाशापासोनी । १ ।
धन्य धन्य चित्तवृत्ती । विठ्ठल भक्तीसी पुढत पुढती ।
त्याचे पूर्वज उद्धरती । गीत गाती रामकृष्ण । २ ।
हेंचि जपतप ध्यान । हरी चरणीं ठेवूनि मन ।
साधलें कार्याचें कारण । रामकृष्ण उच्चारणीं । ३ ।
नामा जपे ठेऊनि चित्त । अखंडचरणीं झाला रत ।
पुरले आमुचे मनोरथ । सर्व कृतार्थ पैं झालों । ४ ।

२०१२. गोविंद गुणाचें निधान । गोविंद नयनीचें अंजन ।
गोविंद बाळकाचें स्थान । गोविंद चिंतन योगियांचें । १ ।
गोविंद पांघुरे कांबळा । गोविंद कृपेचा कोंवळा ।
गोविंद भावालागीं भोळा । गोविंदें अजामेळा उद्धरिलें । २ ।

गोविंद बुद्धिची बुद्धि । गोविंद एकली मांदी ।
गोविंदें हरिली विघ्नव्याधि । गोविंद सिद्धि स्मरलिया । ३ ।
गोविंद गोकुळपाळक । गोविंद अंगवर्णे एक ।
गोविंदें दैत्या लावियला धाक । गोविंद शेष शयनीं । ४ ।
गोविंद आडलिया काजा कैवारी । गोविंद बुडतियातें तारी ।
गोविंद सोळासहस्र नारी । गोविंद बाळ ब्रह्मचारी । ५ ।
गोविंद दान दीक्षा गुरू । गोविंदें अढळ केला धुरु ।
गोविंद नामया दातारु । रुक्मिणीवरु गोविंदु । ६ ।

## मूर्ति किंवा पोथी स्थापना प्रसंगीचे अभंग

२०१३. येथोनिया अवतार । रामकृष्णादि अपार । १ ।
ते हे ध्यान विटे उगले । रूपी रूप सामावले । २ ।
येथोनिया होती जाती । तो हा माझा कृपामूर्ति । ३ ।
अवतार चिन्हमाळा । अंगी जयाच्या सकळा । ४ ।
अवताराची खाणी । नामा म्हणे चक्रपाणी । ५ ।

२०१४. अवताराची राशी तो हा उभा विटेवरी । शंख चक्रगदापद्मसहित हरी । १ ।
देखिला देखिला देवाआदिदेव बरवा । समाधान जीवा पाहतां वाटे गे माये । २ ।
सगुण चतुर्भुज रूपडें तेज पुंजाळती । वंदुनि चरणरज नामा विनवीतसे पुढती । ३ ।

२०१५. देवराज आले मंचकीं बैसले । भक्तांसि दिधलें अभयदान । १ ।
दास हो तुम्ही सकळ सुखी रहा । सुखी राहोनियां आनंद करा । २ ।
रात्रंदिवस माझें करा रे चिंतन । यमाचे बंधन नाहीं तुम्हां । ३ ।
विष्णुदास नामा गाऊनियां गेला । शेजे पहुडला देवराणा । ४ ।

२०१६. उदाराचा राजा उभा भक्तकाजा । उभारोनि भुजा वाट पाहे । १ ।
म्हणे घ्यारे सुख प्रेम अलौकिक । साधन आणिक न लगे कांहीं । २ ।

मनाचेनि मने हृदयीं मज धरा। वाचेसि उच्चारा नाम माझें । ३ ।
जेणें कर्में मज साधिलें पुंडलीकें। तेंचि तुम्हां निकें सांगितलें। ४ ।
अनुदिनीं आवडी करूनि नित्य नवी। मज धरा जिवीं सर्वभावें । ५ ।
म्हणोनि पांडुरंगा उभा भीमातीरीं। नामा निरंतरीं वोळगे चरण। ६ ।

२०१७. म्हणे दीनबंधु तुम्हीं सावध व्हावें। संतांसीं नमन माझे नाम जपावें। १ ।
नामाविण साधन नाहीं कलियुगात। व्यर्थ श्रम होती पाहातां आणिकाचे मत्त। २ ।
मताभिमाने तुम्ही जाल आडवाटां। अभिमानें ठकविलें नारदादि श्रेष्ठां। ३ ।
आलिया जन्मास आतां न करीं आळस। नामदेवालागीं सांगे जगन्निवास। ४ ।

२०१८. देव दयानिधि भक्तांचा कैवारी। नाममात्रें तारी सर्वांलागीं । १ ।
तया देवराया गावें हो आवडी। लागे मनीं गोडी सर्वकाळ । २ ।
नाहीं यातिकूळ उंच नीच भेद। भाव एक शुद्ध पाहातसे। ३ ।
नामा म्हणे काय सांगावे नवल। अखंड दंडलें व्योमाकार । ४ ।

२०१९. देव गुज सांगे पंढरीसि यारे। प्रेमसुख घ्यारे नाम माझें । १ ।
तारीन भवसिंधु घ्यारे माझी भाक। साक्ष पुंडलीक करूनि सांगे। २ ।
काया वाचा मनें दृढ धरा जीवीं। मी त्याचा चालवीं भार सर्व। ३ ।
हें जरी लटिकें नामयासी पुसा। आहे त्या भरंवसा नामीं माझे। ४ ।

२०२०. अठ्ठावीस युगें उभा ठेला द्वारीं। पुंडलीकावरी ठेवुनि लक्ष । १ ।
कृपेचा सागर भक्तजनवत्सल । आमुचा विठ्ठल मायबाप । २ ।
भक्तीसि भाळला अरूप रूपा आला। वेळाईत झाला भक्तालागी । ३ ।
भक्तीचिया रूपें न घडे तें केलें। वैकुंठा आणिलें भूमंडळी । ४ ।
भक्ति मुक्ति सिद्धी त्यापायीं लागती। विद्गद गर्जती विठ्ठलनामें । ५ ।
नामा म्हणे केशव उदाराचा राव। सेवा चरणीं ठाव देई आम्हां । ६ ।

२०२१. अवघी हे पंढरी सुखाची वोवरी। अवघ्या घरोघरीं ब्रह्मानंद। १।
अवघा हा विठ्ठल सुखाचाचि आहे। अनुसरे तो लाहे सर्व सुख। २।
पहावा नयनीं ऐकावा श्रवणीं। अवघा घ्यावा ध्यानीं अवघ्या मनें। ३।
अवघिये आवडी अवघा गावा गीतीं। अवघा सर्वांभूतीं तोचि आहे। ४।
अवघा हा जाणावा अवघा हा मानावा। अवघा वाखाणावा अवघी वाचा। ५।
अवघा ओळखोनि अवघा गिळिजे मनें। अवघा हाचि होणें म्हणे नामा। ६।

२०२२. अवघी हे पंढरी सुखाची मांदुस। माजी स्वयंप्रकाश रत्नहरी। १।
धन्य संतजन येथिंचे पारखी। ज्यां झाली ओळखी विठ्ठलरूपी। २।
अनुभवुनीं चित्तीं पाहिलें विवेकें। धरिलें पुंडलिकें हृदयकमळीं। ३।
भक्तिचे खेवण प्रेमाचें कोंदण। करोनि भूषण भोगितसें। ४।
युगें गेलीं परी पालटचि नाहीं। नित्य शुद्ध पाहीं तेज:पुंज। ५।
पाहतां नित्य नवें ध्यातां चित्त निवे। म्हणोनि नामा जिवें विसंबेना। ६।

२०२३. येईवो येईवो येईवो विठाबाई माऊली ये।
निढळावरी कर ठेऊनि वाट पाहे। १।
येतिया पुसे जातिया थाडी निरोप। पंढरपुरी आहे आमुचा मायबाप। २।
पितांबराची कांस शेला गगनी झळकला।
गरूडावरी बैसोनि आमुचा कैवारी आला। ३।
विठोबाचे राज्य आम्हां नित्य दिवाळी।
विष्णुदास नामा जीवे भावे ओवाळी। ४।

२०२४. झळझळीत सोनसळा। कळस दिसतो सोज्वळा। १।
बरवें बरवें पंढरपुर। विठोबा रायाचें नगर। २।
माहेर संतांचें। नामया स्वामी केशवाचें। ३।

'युगे अठ्ठावीसे' व 'जगन्माता पांडुरंगे' आरत्यानंतर आकल्प आयुष्य अभंग म्हणावा.
श्री पंढरीत चौफाळा येथे हाच अभंग म्हणून सर्व दिंड्यांची आरती होते.

## भगवंताला नैवेद्य अर्पण करताना व पंगतीचे प्रारंभी खालील अभंग हात जोडून म्हणावा

२०२५. केशवा माधवा गोविंदा गोपाळा। जेवीं तूं कृपाळा पांडुरंगा। १।
अच्युता वामना दशरथनंदना। जेवीं तूं बा कृष्णा पांडुरंगा। २।
कृष्णा विष्णु हरी मधुसूदन मुरारी। जेवीं तूं नरहरी पांडुरंगा। ३।
ऐसी ग्लानि करितां विठ्ठल पावला। नैवेद्य जेविला नामयाचा। ४।

भोजनाचे पंगतीत म्हणावयाचे अभंग

२०२६. वैष्णवा घरी मांडिला पाहुणेर। नामाचा वोगर मांडियेला। १।
घ्यारे ताट भरी जेवा पोटभरी। आनंद गजरी रामनाम। २।
होईल पाईरव दुर्जना न सांगावे। एकांति सेवावे नामा म्हणे। ३।

२०२७. आजी आवंतण संतांचे। भोजन झाले हरिनामाचे। १।
आम्ही जेवीलो जेवीलो। नामामृते पूर्ण धालो। २।
बरवी परवडी वैष्णवांची। आवडी पुरली हरिनामाची। ३।
विष्णुदास नामा याती। केशव प्रसाद वाटती। ४।

२०२८. वैष्णवां घरीं सुकाळ। सदा झणझणती टाळ। १।
कण्या भाकरीचें खाणें। गांठीं रामनाम नाणें। २।
बैसावयासी कांबळा। द्वारीं तुळसी रंगमाळा। ३।
घरीं दुभे कामधेनु। तुपावरी तुळसी पानु। ४।
फराळासी पीठ लाह्या। वेळोवेळा पडती पायां। ५।
नामा म्हणे नेणती कांहीं। चित्त रंगले हरीचे पायी। ६।

२०२९. पाला खाऊनियां धाला बहिणी घरीं। भक्तिलागीं हरि वेडा झाला। १।
सुदाम्याचे पोहे कोरडेचि खाय। मटमटां पाहे चहूंकडे। २।
विदुराच्या कण्या खाय धणीवरी। झाला बळिचे द्वारीं द्वारपाळ। ३।
नामा म्हणे हरिचे न कळती पवाडे। नेणों भक्तांपुढें वेडा झाला। ४।

२०३०. काखे पान अंगणीं उभें उगें। भोजन मागें रामनाम। १ ।
आणिक नाहीं मज चाड । रामनाम गोड जेवूं घाला । २ ।
अन्नरस सेवितां मंद पडलें । तुझेचि नाम रुचीस आलें। ३ ।
इच्छाभोजनीं तूं एक दाता । नामा विनवी पंढरिनाथा। ४ ।

२०३१. कोणे एके दिवशीं। विठो गेला जनीपाशीं। १ ।
हळूच मागतो खायासी। काय देऊं बा मी तुसी। २ ।
हातं धरून नेला आंत। वाढी पंचामृत भात। ३ ।
प्रेमसुखाचा ढेंकर दिला। जनी म्हणे विठो धाला। ४ ।

२०३२. माझा हा विठ्ठल येईल गे जेव्हां। जेवीन मी तेव्हां गोणाबाई। १ ।
त्वरे जाऊनिया राउळासी पाहें । लवकरी बाहे भोजनासी। २ ।
भरलिया रागें क्रोध त्याचा साहे। लवकरी बाहे भोजनासी। ३ ।
ज्ञानेश्वराघरीं असेल बैसला। जाउनी विठ्ठला पाहें तेथें। ४ ।
जनी म्हणे देवा चला पुरुषोत्तमा। खोळंबला नामा भोजनासी। ५ ।

२०३३. जेवी जेवी बा विठ्ठला। दहीभात कालविला। १ ।
तुम्हा योग्य नोहे देवा। गोड करोनिया जेवा। २ ।
भाजी भाकर अनाथाची। तूप पोळी समर्थाची। ३ ।
देव जेवोनि बैसले। दासी जनीने विडे दिले। ४ ।

२०३४. षड्रसाचे पक्वान्न। पाक केले रुक्मिणीने। १ ।
आता उठा नारायणा। वेळ झालासे भोजना। २ ।
मांडोनिया रंग पाट। विस्तारोनि ठेविले ताट। ३ ।
देव जेवोनि बैसले। दासी जनीने विडे दिले। ४ ।

२०३५. जेवी जेवी बा मुरारी। तुज वाढिली शिदोरी। १ ।
कनकाचे ताटी। दहीदुधे भरली वाटी। २ ।
आमुचे ब्रह्म सारंगपाणि। हिंडतसे रानोरानी। ३ ।

गोपाळांचे मेळी । हरी खेळे चेंडूफळी । ४ ।
तुळशीचे वनी । उभी राहे दासी जनी । ५ ।

२०३६. खडतरले आसन त्यावरी धुडतरले वसन ।
रत्नजडीत सिंहासन तुजला कैसे रे विठोबा । १ ।
काय करू उपचार भक्ति भावाचा लाचार ।
तू विश्वी विश्वाधार सर्व साक्षी रे विठोबा । २ ।
फुटकासा तुंबा कैसे उदक घेसील तू बा ।
वाट पाहे रूक्मिणी ताट वाढून रे विठोबा । ३ ।
वाळ्ळे चिळ्ळे कुटके तेहि विटके आणि मोडके ।
माझ्या दासी घरचे कैसे खासी रे विठोबा । ४ ।
मोडकिसी बाज त्यावरी वाकळेची सेज ।
तुज सुकुमारासी नीज कैसी येईल रे विठोबा । ५ ।
काया कुर्वंडिली प्राण पुष्पे वाहिली ।
काय ठावी नाही झाली दासी जनी रे विठोबा । ६ ।

## संत महिमान व दर्शन

२०३७. ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले । उद्धरावया आले दीन जनां । १ ।
ब्रह्मादिक त्यांचे वंदिती पायवणी । नाम घेता वदनीं दोष जाती । २ ।
हो कां दुराचारी विषयीं आसक्त । संतकृपें त्वरित उद्धरतो । ३ ।
अखंडित नामा त्यांची वास पाहे । निशिदिनीं ध्याय संतसंग । ४ ।

२०३८. संताचा महिमा कोण जाणे सीमा । सीणला हा ब्रह्मा बोलवेना । १ ।
संतांची हे कळां पाहतां न कळे । खेळोनियां खेळ वेगळाचि । २ ।
संतांचिया पारा नेणें अवतारा । म्हणती याच्या पारा कोण जाणे । ३ ।
नामा म्हणे धन्य धन्य भेट झाली । कल्पना निमाली संतांपायीं । ४ ।

२०३९. रवि रश्मि धरोनि स्वर्गी जाऊं येईल । परी साधुसंगतीचा पार नकळे नकळे । १ ।
वैतरणी उतरोनि वैकुंठा जाऊं येईल । परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे । २ ।
स्वप्नींचा हा ठेवा साचहि होईल । परि साधुसंगतीचा पार नकळे नकळे । ३ ।
मायबाप बंधु भगिनी मिळे योनी । परि साधुची मिळणी भाग्ययोगें । ४ ।
तपें व्रतें दानें गोविंद पैं भेटे । परि साधु तंव न भेटे भाग्येंविण । ५ ।
नामा म्हणे केशवा बरा साधुसंग । यावेगळा भवरोग न तुटे न तुटे । ६ ।

२०४०. धणीवरी ध्यान करीं कारे मना । या सुख निधाना विठोबाच्या । १ ।
पढिये तैसें सुख आहे याचें पायीं । अनुसरोनि राहीं एकवेळ । २ ।
श्रीमुख साजिरें पाहीं दृष्टिभरी । जिवित्वाचें करीं निंबलोण । ३ ।
जेणें लक्ष धरोनि आहे पुंडलीक । तोचि भाव एक दृढ धरीं । ४ ।
नलगे गुरूमंत्र नलगे जप तप । उघडें स्वरूप विटेवरी । ५ ।
नामा म्हणे धरी निकट संतचरण । तरीच प्रेमखूण पावसील । ६ ।

२०४१. मायेविण जें माहेर । ममतेविण जे सोयरे । धृ० ।
ते मज भेटवी केशवा । संत विश्रांतिचा ठेवा । १ ।
आंगेंविण अलिंगन । देऊनि निववीलें तनुमन । २ ।
असुनि नसती सर्वगत । सर्वांभूतीं सर्वातीत । ३ ।
लोभाविण लोभापर । लोभाविरहित करुणाकर । ४ ।
नामा म्हणे विठोबाचे भेटी । प्राण दाटलासे कंठीं । ५ ।

२०४२. कर्दळी फळ कर्पूर परिमळें भिन्न । परि दोहींचें जन्म तें एकत्र जाण ।
आत्मा कीं परमात्मा अभेद कीं भिन्न । चंद्र सोमकांत शून्य महाशून्य । १ ।
सूर्य सूर्यकांत प्रकाश एकु । साधुसंत आरति रावो न रंकु । २ ।
भ्रमरांच्या रूंजी मकरंद उधळती । असाध्य साधनीं लागल्या ज्योति ।
लयाचें लक्ष हारपली स्थिति । म्हणोनि साधुचरणीं नित्य पंचारती । ३ ।
गोदेचा उगमु तो ठाईच्या ठाईं । आणिकें उदकें तीं चाली प्रवाहीं ।
तैसी साधुसंत कृपा उन्मत्त देहीं । सागरा भेटली क्षीरसिंधु तेही । ४ ।

सागरीचे उदक जगा निववीत । निवळूनि मागुतें पूर्ण भरीत ।
तैसें अंतरीचें नीर ओघें हे साधुसंत । परि सागरा अंतरीं न वर्णवेमुक्त। ५ ।
तेथें अनुपम्य ऐकिजे शब्दाचि रचना। हें जाणतेनो जाणा अमृतखुणा।
हें रत्न कीं माणिक ऐसें अनुमाना । तें पानबुडिया परसोबा लाधलें निधाना। ६ ।
दुधावरील सायेवरी साखर मेळवणी। जैसी जिव्हा लोधली मधु लागुनि।
तेथील गौलता तें रहस्य लागलें ध्यानीं । तें परसोबा लाधलें येरां मूर्खां भुलवणी। ७ ।
तापलें लोहो तेणें शोषियेलें जीवन । तैसें अंतरीं निवालें आपेआप आपण।
परसा भागवत हें सकळांचें जीवन। विष्णुदास नामा त्याचे चरणींचे रजरेण। ८ ।

२०४३. देवाचे हे आत्मे ते हे जाणावे संत । त्यांचे पदीं व्हावें रत सदा दृढ। १ ।
श्रीहरीची भेटी सहजचि होय। श्रम लया जाय झाला आधीं। २ ।
पापाचे पर्वत भस्म नामाग्नीनें । अभक्तांसी हाण नामाविण। ३ ।
नामदेव म्हणे नामाग्नीच्या पोटीं। नाना पाप कोटीं दग्ध होती। ४ ।

२०४४. आजी महासुखें सृष्टी भरली भाग्यवंती। जालीसे विकृती पापा तापा। १ ।
चालिले देखोनि वैष्णव जगजेठी। उभविती वैकुंठीं गुढिया देव। २ ।
आले आले रे हरीचे डिंगर। वीर वारीकर पंढरीचे। ३ ।
ज्याची चरण धुळी उधळे गगनपंथें। ब्रह्मादिकां तेथें झाली दाटी। ४ ।
एकमेकांपुढें उडविती माथे। म्हणती आम्हातें लागो रज। ५ ।
भक्ति प्रेम भाव भरले ज्यांच्या अंगीं। नाचती हरिरंगीं नेणती लाजु। ६ ।
हर्षें निर्भर चित्तीं आनंदें डोलती। हृदयीं कृष्णमूर्ति भेटो आली। ७ ।
कोंदलें हरिरूप देखती विश्वाकार। सुटले पाझर नयन कमळीं। ८ ।
गुढिया रोमांकुरीं सात्विकें दाटले। गर्जती विठ्ठले नामघोष। ९ ।
मोरपिसा कुंचे थाट गरूडटके । भार ते नेटके मिरविताती। १०।
तेथें केशवाचे नामें तनु हे तुळिका केली। पायघडी घातली हरिच्या दासा। ११।

२०४५. बहु सुख देखिलें संताचे चरणीं । भवश्रमापासुनि मुक्त झालों। १ ।
तेणें मी विसरलों संमोहाचें दुःख। नेणें ताहान भूक काय झाली। २ ।
सुख जेवीं चकोरा चंद्र देखतां दृष्टी। जैसी मज भेटी हरिदासांची। ३ ।
तृषाक्रांता सुख देखतां सरिता । तैसें मज होतां संत भेटी । ४ ।
शिणल्या पाडसा सुख ओसंगीं। तैसा मी संतसंगीं तुष्ट होय । ५ ।
चुकल्या बाळा सुख भेटतां कुरंगिणी । तैसी मज धणी संतसंगें । ६ ।
नामा म्हणे त्याचा वियोग केशवा। होते क्षणीं जावा प्राण माझा। ७ ।

२०४६. ध्वजा कुंचे गरूडटके । वैष्णव चालिले नेटके। १ ।
आलें वैष्णवांचें दळ । भेणें पळे कळिकाळ। २ ।
तुळसी मंजरीचे भाले । देखोनि यमदूत पळाले। ३ ।
ऐकोनि नामाचा गजर। प्रेमें डुल्लतो शंकर । ४ ।
नामा म्हणे भक्ति गाढी । सेवा न सोडीं अर्ध घडी। ५ ।

२०४७. आला वैष्णवांचा मेळ । पळालाहो कळिकाळ । १ ।
आले आले हरिदास । कळिकाळावरी घाला कास। २ ।
कल्मषा पडिला थाक । ते पळाली देऊनि हाक । ३ ।
पैल नामा केशवाचा । सवें मेळु वैष्णवांचा । ४ ।

२०४८. भक्त केशवाचे आले । दूत यमाचे पळाले । १ ।
भक्त हरीचे चालिले । हातीं हरिनामाचे भाले। २ ।
तळपे शांतीचें ओढण । घेती स्वानंदें उड्डाण। ३ ।
नामा म्हणे निजदास । कळिकाळाचे भरंवसे। ४ ।

२०४९. यम सांगूं गेला वैकुंठा। देवा सांभाळा जी आपुल्या मठा।
आम्ही नव जाऊं तयांचिया वाटा । वैष्णवदूत नागवती । १ ।
कुंभिपाक पडला ओस । दूतां लागला त्रास ।
देवा कोपेल महेश । म्हणोनि सांगावया आलों । २ ।

देवा तुम्हीं एक वोखटें केलें। गंगेसि मृत्युलोकासी पाठविलें।
तेणें थोर कार्य नाशिलें। हा प्रसाद गौतमाचा। ३ ।
ऐसे वैष्णवदूतीं गांजिलों। तुजप्रति सांगावया आलों।
देवें पाहिजे मना आणिलों। माझें साह्य करावें स्वामी। ४ ।
विशेष शिंपी नामा। तो पंढरीये पुरूषोत्तमा।
हाचि बोल ऐकूनि प्रेमा। त्याच्या शिवा न जावें। ५ ।

२०५०. यम सांगे दूतां कानीं। तुम्ही जातां मेदिनी।
विष्णुभक्त चुकवूनि। येर बांधोनि आणा। १ ।
दूत सांगती यमा। दिंडीपुढें चाले नामा।
ते नागविती आम्हा। विष्णुदूत म्हणोनी। २ ।
जे नेणती धर्मवेळा। वाचे न उच्चारिती गोपाळा।
तयांसि जाचवावें वेळोवेळां। एकवीस कुळांसहित। ३ ।
जे न करिती हरिची भक्ति। तयांसी जाचवावें पुढता पुढती।
रघुनाथनाम ज्याच्या कंठीं। त्याच्या वाटे नव जावें। ४ ।
दिंडी पताका गजर टाळघोषाचा। नाद उमटतो अंबरींचा।
तेथें पाड नाहीं काळाचा। शिंपी नामा दळपति केशवरायाचा। ५ ।

२०५१. सांडोनि नित्य नेम कर्म। बोलती कळिकाळाचें वर्म। १ ।
नामधारक नामाचे। झाले डिंगर केशवाचे। २ ।
टाळ मृदंग वाजती। टके पताका शोभती। ३ ।
कंठीं तुळसींच्या माळा। वज्र पंजराचा टिळा। ४ ।
शंख चक्र मुद्रा धरणें। अंगीं मिरवती भूषणें। ५ ।
संतरज उधळले। तेणें सर्वांग डंवरलें। ६ ।
सहस्रनामें गर्जित। तेणें पळाले यमदूत। ७ ।
नामा म्हणे ते माझे सखे। स्वामी विठोबासारिखे। ८ ।

२०५२. धन्य धन्य साधु वर्तति भूतळीं। जे कां भाळींभोळीं तारावया। १ ।
जयाच्या दर्शनें पातकाची धुणी। होय तो सज्जनीं मान्य सदा। २ ।
विश्वीं विश्वंभर दाखविती पूर्ण। भवाचें बंधन तोडोनियां। ३ ।
जाती विजाती व्हावया प्रज्ञानहो। एक मग मोहो सोडविती। ४ ।
नामा म्हणे सदां साधुसी वर्णितां। वाचे पवित्रता अखंडित। ५ ।

२०५३. सर्वांभूतीं पाहें एक वासुदेव। पुसोनियां ठाव अहंतेचा। १ ।
तोचि संतसाधु ओळखावा निका। येर ते आईका मायाबद्ध। २ ।
देखिलिया धन मृत्तिकेसमान। नवविधा रत्नें जैसे धोंडे। ३ ।
काम क्रोध दोघे घातले बाहेरी। शांति क्षमा घरीं राबवित। ४ ।
नामा म्हणे नाम गोविंदाचें वाचे। विसंबेना त्याचे क्षणमात्र। ५ ।

२०५४. नावडे निजांगना शेजेवरी रूचेसी। कीं पतिसेजे जेविं व्यभिचारिणी अप्रीत जैसी। १ ।
गांधी विष संग्रहीत भक्षणाची नाहीं प्रीत। चकोरा देखत सिद्धि अमावास्या। २ ।
याचपरी संत वर्ते प्रपंच देह कर्मी। समूळ बुडे ब्रह्मीं ब्रह्मपणें। ३ ।
पोसणा पुत्र लटकेंचि बाबा म्हणे। स्वपितयातें अंतरूनि पिंडदान करणें। ४ ।
बहुरूपि स्त्रियेचे कटाक्ष इतरां दावी। आपण जाणत जीवीं हें मी नव्हे। ५ ।
शत्रु सभे नाना उपचार होती। ते न लगती कांहीं चित्तीं भूपा। ६ ।
नामा म्हणे हृदयी मानीं योगी निरंजन मनीं। मिथ्या विनोद कानीं क्षणिक जैसा। ७ ।

२०५५. आशा नाहीं ज्याला। देव कामारी तयाला। १ ।
जेव्हां सुखाचि उन्नती। मोह पायांसी लागती। २ ।
सर्वां चित्तीं समभाव। सर्व मानी वासुदेव। ३ ।
नामा म्हणे अंगीं प्रेम। मुखीं विठोबाचें नाम। ४ ।

२०५६. धन्य महाराज जन्मले संसारीं। जे ध्याती अंतरीं नारायणा। १ ।
नारायण गाय नारायण ध्याय। धन्य त्यासि माय प्रसवली। २ ।
प्रसवली तया कुळाचा उद्धार। तो तरे निर्धार नामा म्हणे। ३ ।

२०५७. जयाचेनि तीर्था आलें तीर्थपण। केली सांठवण हृदयीं ती। १।
नवल महिमा हरिदासां जीवीं। तीर्थें उपजवी त्यांचे कुसीं। २।
वाराणसीं प्राणी मरे अंतीं कोणी। तया चक्रपाणि नामें तारी। ३।
नामा म्हणे तीर्थें तया येती भेटी। वोळंगती दृष्टी त्रिभुवना। ४।

२०५८. सत्त्वसमाधानी कर्मनिष्ठ जाण। अखंडित ध्यान रामकृष्ण। १।
सत्संग सर्वदा साक्ष सर्व देहीं। सर्वांभूतीं पाहीं अंशमात्रें। २।
आपणासमान सर्वत्र पाहाती। अन्य सर्वांभूतीं रामविष्णु। ३।
नामा म्हणे ऐसें सकळिकें संमत। नामीं सदोदित भक्ति मार्ग। ४।

२०५९. नित्य सर्वकाळ पुण्याचिया राशी। हरिनाम आलेया जिव्हेसी।
नित्य तपानुष्ठानाच्या राशी। कोटि यज्ञासी लाभ झाला। १।
धन्य धन्य त्याचा वंश। जे जे रतले नामास।
रामनामीं नित्य सौरस। ते विष्णुदास पवित्र जाणा। २।
पवित्र ते स्वधर्मीं। ज्यांसी सर्वकाळ नेम नामीं।
तयांचें नाम पूर्णकामीं। मनोरथ पुरतील। ३।
नामा जपे नाम हरीचें। सार्थक केलें संसाराचें।
ओझें फेडिलें पूर्वजन्मींचें। हरी स्मरण केलिया। ४।

२०६०. एक भानु अवघा सृष्टीचा सोहळा। व्यापूनि सकळा आकाशासी। १।
पवनसिंधुवरी मन वेगें पाखरी। मार्गु षट्चक्री वैकुंठासी। २।
तोचि भोगी सुख चिदानंदीं वासु। संतसंगें प्रकाशु सफळ मग। ३।
नामा म्हणे यासी गुरूकृपा पाहिजे। संतसंगें पाविजे केशवचरण। ४।

२०६१. धन्य नरदेहीं संतसंग करी। त्रैलोक्य उद्धरी हेळामात्रें। १।
नेणे सुख दुःख शरीराचें भान। अखंड भजन केशवाचें। २।
कर्म करूनियां होय शुचिष्मंत। नामामृतीं प्रीत सर्वकाळ। ३।
नामा म्हणे ऐसे वर्ते देहभावीं। मूढजनां दावी भक्तिमार्ग। ४।

२०६२. धन्य तोचि देश जेथें संतवास । तापत्रयदोष जाती सत्य । १ ।
धन्य मातापिता उभयकुळशुद्धता । तोचि भजे संतां निर्धारिंसी । २ ।
तीर्थरूपी जळ विलंबें करी निर्मळ । संतदर्शनें तत्काळ शुद्ध होती । ३ ।
धातुमय मूर्ति चिरकाळें फळती । संतांचे संगतीं निजस्वार्थ । ४ ।
नामा म्हणे मुक्ति जे नर इच्छिती । संतांचे संगती धरती भाव । ५ ।

२०६३. बहुरूप्या ब्राह्मणा पडियेलें मित्र । दोहींचें तें गोत्र एक झालें । १ ।
संग तोचि बाधी संग तोचि बाधी । कुसंग तो बाधी नारायणा । २ ।
वेश्या पतिव्रते पडियेला शेजार । दोहींचा आचार एक झाला । ३ ।
नामा विष्णुदास सत्संगति बोधला । आत्मा हा लाधला पांडुरंग । ४ ।

२०६४. जायाचें सांवळें जायाचीं ही चोळी । जायाची गरसोळी तीहि जाय । १ ।
जिणें हें जायाचें जिणें तें जायाचें । तें पैल कोणाचें देणें आहे । २ ।
जायाचा आचार जायाचा विचार । जायाचा भ्रतार क्षणभरी । ३ ।
नामा म्हणे अवघें जिणें तें जायाचें । संतसंगतीचें सुख घ्यावें । ४ ।

२०६५. संतसंगतीचें काय सांगूं सुख । आपणा पारिखें नाहीं तेथें । १ ।
साधु थोर जाणा साधु थोर जाणा । साधु थोर जाणा कलियुगीं । २ ।
इहलोकीं तोचि सर्वांभूतीं सम । शरीराचा भ्रम नेणे कदा । ३ ।
नामा म्हणे गाय दूध एक सरे । साधु निरंतर वर्ते तैसा । ४ ।

२०६६. होईन संतांचा वोळगणा । दास डिंगर पोसणा । १ ।
प्रेम द्यावें नारायणा । भूतदया परिपूर्णा । २ ।
संतचरणींचे रज । हेंचि सर्व तीर्थ मज । ३ ।
सेवीन संतउष्टावळी । तेणें पवित्र माझी कुळी । ४ ।
राखेन संतांचें मी द्वार । तें मज वैकुंठाहुनि थोर । ५ ।
नामा म्हणे पंढरीनाथा । न मागें आन सर्वथा । ६ ।

२०६७. पूर्ण कृपा केली देवा । दिधली पादपद्मसेवा । १ ।
पापें पळालीं पळालीं । नामकीर्तनकल्लोळीं । २ ।
रंगमाळा जागरणीं । तेथें मुक्ति वाहती पाणी । ३ ।
जन्म वैष्णवकुळीं द्यावा । घडो संतांचि हे सेवा । ४ ।
नामदेवाची आवडी । संतचरणीं देतो बुडी । ५ ।

२०६८. थांऊनियां मिठी घालीन संतचरणीं । सांगेन वचनीं मनिंचें गुज । १ ।
विठोबाचे गांवा न्यारे एकवेळां । फार आहळला जीव माझा । २ ।
आनंदाचें जीवन पाहेन श्रीमुख । शोक मोह दुःख हरती माझे । ३ ।
विटेसहित चरण देईन आलिंगनु । तेणें माझी तनु ओल्हावेल । ४ ।
तुम्ही आवडते हरीचें अंतरंग । माझे जिवलग प्राणसखे । ५ ।
नामा म्हणे विठोबा कृपेची माउली । तळहाते साउली करील मज । ६ ।

२०६९. भोळ्या भाविकांचें वचन नुलंघी । फिरतसे संगें तया मागें । १ ।
मी एक अभक्त मी एक अभक्त । मी एक अभक्त पापराशी । २ ।
नाममाळा दृढ न करीं जतन । परि जाणे वर्मखूण संतसंगें । ३ ।
नामा म्हणे नाहीं तुम्हांसी उपमा । आमुचे स्वधर्म शुद्ध नाहीं । ४ ।

२०७०. परिसाचेनि संगें लोह होय सुवर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें । १ ।
कीटकी ध्यातां भृंगी झाला तोचि वर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें । २ ।
वनस्पति परिमळु चंदन झाला जाण । तैसा भेटे नारायण संतसंगें । ३ ।
अग्नीस मिळे तें नये परतोन । तैसा भेटे नारायण संतसंगें । ४ ।
सरिता ओघ जाय सिंधूसि मिळून । तैसा भेटे नारायण संतसंगें । ५ ।
नामा म्हणे केशवा मज देईं संतसंग । आणिक कांहीं तुज न मागें बापा । ६ ।

२०७१. येतां जातां थोर कष्टलो गर्भवासीं । पडिलों गा उपवासी प्रेमेंविण । १ ।
बहुतांचा सेवकु झालो काकुळती । न पावे विश्रांति कधीं काळीं । २ ।

ऐसें माझें मन शिणलें नानापरी । घालीन आभारी संतांचिया । ३ ।
वियोगें संताच्या व्याकुळ चिंतातुर । हिंडे दारोदार दीन रूपें । ४ ।
परि कोणी संतांच्या न घालिती चरणीं । तळमळी अनुदिनी श्रांत सदा । ५ ।
माझें माझें म्हणवूनि जया घाली मिठी । दिसे तेंचि दिठी नाहीं होय । ६ ।
तया शोकानळें संतप्त आंदोळे । गेले तें न मिळे कदा काळीं । ७ ।
न देखत ठायीं देखावया धांवें । भ्रांति भुले भावें नानामार्गीं । ८ ।
तुझा स्वरूपानंदु नाहीं ओळखिला । जाहली विठ्ठला हानि थोर । ९ ।
लोहाचा कवळु लागल्या परिसातें । पढिये सर्वांते होय जेंवि । १० ।
नामा म्हणे तैसी भेटी संतचरणीं । करूनि त्रिभुवनीं होईन सरता । ११ ।

२०७२. सुख सांगावें संतांपुढें । जेणें सुख अधिक वाढे । १ ।
आणिका न करावें शाहणे । प्रेम दिठावेल झणें । २ ।
खंडिला कल्पनेचा लाग । त्यासि असावा अनुराग । ३ ।
तोडिला वासनेचा तंतु । त्यासि असावा एकांतु । ४ ।
गिळिलें अहंतेचें बीज । त्याचे व्हावें चरणरज । ५ ।
नामा म्हणे त्या संगतीं । चित्ता आपेंआप निवृत्ति । ६ ।

२०७३. भस्म तो होतसे आला जो आकारा । नासे प्रपंच सारा नाममंत्र । १ ।
झाला अनुभव प्रपंचींच ब्रह्म । मना झाला निश्चय संतकृपे । २ ।
म्हणोनियां संतां जावोनि शरण । साधुनि निजधन नामब्रह्म । ३ ।
नामदेव म्हणे संतांचेनि कृपें । हृदयीं नाम सोपें नांदतसे । ४ ।

२०७४. संतांच्या चरणा द्यावें अलिंगन । जीवें निंबलोण उतरावें । १ ।
तेथें तूं निश्चळ राहें माझ्या मना । मग तुज यातना नव्हती कांहीं । २ ।
संतांचे द्वारींचे होईं द्वारपाळ । तुटे मायाजाळ मोहपाश । ३ ।
संतांचे प्रसाद सेविसीं उरले । आयुष्य सरलें दुणावेल । ४ ।
नामा म्हणे संत आहेत कृपासिंधु । देती भक्तिबोधु प्रेमसुख । ५ ।

२०७५. मंत्रयंत्र दीक्षा सांगतील लक्ष। परि राम प्रत्यक्ष न करी कोण्ही। १ ।
प्रत्यक्ष दावील राम धरीन त्याचे पाय। आणिकांची काय चाड मज। २ ।
सर्व कामीं राम भेटविती मातें। जीवेंभावें त्यातें ओंवाळीन। ३ ।
नामा म्हणे आम्हां थोर लाभ झाला। सोइरा भेटला अंतरींचा। ४ ।

२०७६. आपुलें शरीर घालूनियां पुढें। पडे वार्डेकोर्डे सर्वभावें। १ ।
नाम आवडती नानाभूत सृष्टी। देखेन मी दृष्टीं ब्रह्मरूप। २ ।
विष्णुरूप सर्व भावी अखंडित। मानी सर्वभूत आत्मा माझा। ३ ।
नामा म्हणे सत्य सत्य जे बोलती । त्यांचे पायींची माती इच्छितसें। ४ ।

२०७७. संतांचें लक्षण ओळखाया खूण । जो दिसे उदासीन देहभावा। १ ।
सतत अंतरीं प्रेमाचा जिव्हाळा। वाचे वसे चाळा रामकृष्ण। २ ।
त्या संताचे चरण देखिले मीं दृष्टीं। जळती कल्पकोटी पापराशी। ३ ।
जयाच्या हृदयीं प्रेमाचा जिव्हाळा। जीवेंभावें गोपाळा न विसंबती। ४ ।
त्याचे आंगणींचा होईन सांडोवा। मग तूं केशवा नुपेक्षिसी। ५ ।
तुझ्या ध्यानीं ज्याचें सदा भरलें मन। विश्व तूंचि म्हणोन भजती भावें। ६ ।
त्याच्या उष्टावळीचा होईन मागता। तरीच पंढरीनाथा भेटी देसी। ७ ।
ऐसे नित्यानंदें बोधें जे निवाले। ते जिवावेगळे न करीं नामा। ८ ।

२०७८. माझे मायबाप साधुसंतजन। माझे जीवप्राण अंतरींचे। १ ।
भवभयाहुनि तारियेलें मज । बाळेंभोळें गुज प्रेम दावी। २ ।
रंकाहुनि रंक झालों मी सेवक। ब्रह्मादिक देख इच्छिती सुख। ३ ।
नामा म्हणे संतभाग्य अलौकिक। शुद्ध निष्कलंक पुण्यरूप। ४ ।

२०७९. पंढरीचें प्रेम आहे ज्यांचे जीवीं। त्यांची नित्य नवी करीन आशा। १ ।
ते माझे सोइरे सुखाचे सद्गुरू। भवसिंधुचा पारू उतरती । २ ।
माझ्या विठोबाच्या नामीं ज्यां विश्वास। होइन त्यांचा दास आवडीचा। ३ ।

माझ्या विठोबाच्या चरणीं ज्यांचा भाव। दारवंटा पाय धरीन त्यांचे । ४ ।
माझ्या विठोबाचें ध्यान ज्यांचे मनीं । सांडोवा अंगणीं होईन त्यांचे। ५ ।
ऐसे सर्वभावें माझ्या विठोबा शरण। त्यांचे वंदीन चरण नामा म्हणे। ६ ।

२०८०. पंढरीचें सुख जिहीं अनुभविलें। भावें अनुसरले विठ्ठलपायीं। १ ।
काया वाचा मन रंगलें चरणीं । धरियेला मनीं पांडुरंग। २ ।
नामाचेनि बळें उडविलीं साधनें। तोडिलीं बंधनें संसाराचीं । ३ ।
योगियांचें घर रिघे काकुलती। आव्हेरीलें संतीं म्हणोनियां। ४ ।
दोन्ही कर जोडुनि मोक्ष पाहे वास । म्हणे होईन दास हरिदासाचा। ५ ।
तंव तुच्छ करोनि न पाहती दृष्टी। आपंगिलें शेवटीं ब्रह्मज्ञानें । ६ ।
अष्ट महासिद्धि म्हणती कवण गति। यावें काकुलती कवणा आम्ही। ७ ।
मोक्ष मुक्ति जिहीं हाणितल्या पायीं । आमुची ते सोयी काय धरिती। ८ ।
ऐसे भक्तराज देवां वंद्य झाले । ते एक राज्य केलें पुंडलिकें। ९ ।
हर्षे निर्भर नामा नाचे महाद्वारीं। मुखी निरंतरी नामघोष।१०।

२०८१. नामामृत सरिता पवित्र हरिकथा। त्रिभुवनींच्या तीर्थां मुगुटमणि। १ ।
तेथें माझ्या मना होईं क्षेत्रवासी। राहें संतांपाशीं सुख घेतां। २ ।
ऐहिक्य परत्र दोन्हीं . समतीरीं । परमानंदलहरी झेंपावत। ३ ।
मुक्तांचें जीवन मुमुक्षा माउली। शिणल्या साउली विषयासक्तां। ४ ।
परमहंसकुळ सनकादिक सकळ। राहिले निश्चळ करोनि चित्त। ५ ।
नामा म्हणे मना सोइरे हरिजन। तारक त्यांचे चरण दृढ धरीं। ६ ।

२०८२. तुझिया संतांची अंगसंगसंगति । पावलिया विश्राति संसारिया। १ ।
श्रवण कीर्तन ध्यान घडे अनायासें । भेदभ्रम नासे तेचि क्षणीं। २ ।
ऐसें भाग्य मज देसी कवणे काळीं। होईन पायधुळी वैष्णवांची। ३ ।
वदनीं तुझें नाम वसे निरंतर। राखीन त्याचें द्वार थोर आशा। ४ ।
येतां जातां मज करिती सावधान। वदनीं कृष्ण कृष्ण म्हणविती। ५ ।

कामधेनु घरीं असे प्रसवली। ते विकावया नेली दैवहतें। ६।
पंथीं पडिला पायां लागे चिंतामणि। पाषाण म्हणऊनि उपेक्षिला। ७।
तैशी परी मज जाहली अधमा। चुकलों तुझ्या वर्मा केशिराजा। ८।
नामा म्हणे थोर खंती वाटे चित्ता। कृपा करूनि माथा ठेवी चरणीं। ९।

२०८३. जैसा वृक्ष नेणे मान अपमान। तैसे ते सज्जन वर्तताती। १।
येऊनियां पूजा प्राणि जे करिती। त्याचें सुख चित्तीं तया नाहीं। २।
अथवा कोणी प्राणि येऊनि तोडिती। तया न म्हणती छेदूं नका। ३।
निंदास्तुति सम मानिती जे संत। पूर्ण धैर्यवंत साधु ऐसे। ४।
नामा म्हणे त्यांची जरी होय भेटी। तरी जीव शिवा गांठी पडूनि जाय। ५।

२०८४. अवघे ते संसारीं जाणावे ते धन्य। ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं। १।
अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचे। अवघे कुळ त्याचें पुण्यरूप। २।
अवघ्यारूपीं एक विठ्ठल भाविती। अवघ्या मनें भजती अवघेपणें। ३।
अवघे मिथ्या जाणोनि अवघिया विठ्ठलें। अवघे विनटले विठ्ठलपायीं। ४।
अवघे पूर्ण बोधें भावें प्रेमें प्रीती। ध्यानीं गीतीं गाती केशिराज। ५।
अवघा हा विठ्ठलु भोगी दिनराती। वोळंगें किंकरवृत्ति नामा त्यासी। ६।

२०८५. संत-चरण-रज सेवितां सहज। वासनेचें बीज जळुनी जाय। १।
मग रामनामीं उपजे आवडी। सुख घडोघडी वाढों लागे। २।
भेदभ्रम आटे आशापाश तुटे। विश्रांति हे भेटे संतसंगे। ३।
प्रेमें कंठ दाटे आनंदें पूर लोटे। हृदयीं प्रगटे रामरूप। ४।
नामा म्हणे सोपें साधन गोमटें। साधे त्या उत्कृष्ट पूर्वपुण्यें। ५।

२०८६. धन्य तोचि जगीं जाणा राजयोगी। जेणे पांडुरंगी धरिला भाव। १।
संकल्प विकल्प शून्य करूनि मन। हृदयी धरिले ध्यान विठोबाचे। २।
महापापराशी त्याचा झाली होळी। वाजविता टाळी विठ्ठल नामे। ३।

कोटी कुळे त्याची क्षणेचि पावन। करिता एक स्नान चंद्रभागे। ४ ।
नामा म्हणे धन्य धन्य ते संसारी। चालविती वारी पंढरीची । ५ ।

२०८७. ज्याचियारे मनें देखियेलें तुज । त्याची लोकलाज मावळली। १ ।
नाहीं तया क्रिया नाहीं तया कर्म। वर्णाश्रमधर्म सुख दु:ख । २ ।
नाहीं देहस्फूर्ति जाती कूळ भेद । अखंड आनंद ऐक्यतेचा । ३ ।
नामा म्हणे त्याचे चरणरज व्हावें । हेंचि भावे द्यावें केशिराजा। ४ ।

२०८८. संतापायीं माथा धरितां सद्भाव । तेणें भेटे देव आपेंआप। १ ।
म्हणवूनि संतांसी अखंड भजावें। त्यांचे पायी व्हावे लीन सदा। २ ।
संताघरी देव कामधंदा करी। पीतांबर धरी वरी छाया । ३ ।
नामा म्हणे देव इच्छी संतसंग । आम्हा जीवलग जन्मोजन्मीं। ४ ।

२०८९. आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळां । माझिया सकळां हरिच्या दासां। १ ।
कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । हि संत मंडळी सुखी असो । २ ।
अहंकाराचा वारा न लागो राजसां । माझ्या विष्णुदासां भाविकांसी। ३ ।
नामा म्हणे तया असावें कल्याण। ज्या मुखीं निधान पांडुरंग । ४ ।

भक्त पुंडलिक कार्याचे महिमान माघ शुद्ध एकादशीस, श्री पुंडलिकरायांचा उत्सव श्री क्षेत्र पंढरी येथे श्री पुंडलिकरायांचे मंदिराजवळ संपन्न होतो

२०९०. प्रल्हादा रक्षिलें पांडवां प्रतिपाळिलें। तया उभें केलें पुंडलिकें । १ ।
बिभिषणा स्थापिलें ध्रुवा अढळ केलें । तया उभें केलें पुंडलिकें । २ ।
चैद्यादि मर्दिले सुरवर तारीले । तया उभें केलें पुंडलीकें । ३ ।
अहिल्ये उद्धरिलें गजेंद्रा उद्धरिलें । तया उभें केलें पुंडलीकें । ४ ।
गयासुरा वधिलें बळिस पाताळीं घातलें। तया उभें केलें पुंडलीकें । ५ ।
नामा म्हणे केशवा भक्तांचें ठेवणें। घेऊनि कोंवि जाणें घडे तुज। ६ ।

२०९१. भक्त पुंडलिका देखोनि निकटा । आलासी वैकुंठाहुनि आजी । १ ।
नारद वचन ऐकोनियां मनीं । सुखें चक्रपाणि सुखावला। २ ।

पंढरीस जातां प्रेम उचंबळत। आनंदें गर्जत नामघोष। ३ ।
विश्वमूर्ति विठो विश्वंभर देखे। विसरला दुःखें देहभाव। ४ ।
नामा म्हणे त्याचा होईन चरणरज । नुपेक्षील मज पांडुरंग। ५ ।

२१८२. आषाढी कार्तिकी हेचि आम्हां सुगी। शोभा पांडुरंगीं घनवटे। १ ।
संतांचीं दर्शनें हेंचि पीक जाण। देतां आलिंगन देह निवे। २ ।
देह निवे किती नवल सांगावें। जीवासी दुणावे ब्रह्मानंद। ३ ।
नामा म्हणे यासी मूळ पांडुरंग। त्याचेनि अव्यंग सुख आम्हां। ४ ।

२१८३. विठ्ठलाचें नाम जे माउलिचे ओंठीं। विठो तिचे पोटीं गर्भवासी। १ ।
जयाचिये कुळीं पंढरीची वारी। विठो त्याचे घरीं बाळलीळा। २ ।
नामा म्हणे जिव्हे काढीन मी रवा। असत्य केशवा चंदन वचन होतां। ३ ।

२१८४. पंढरीची वारी जयाचिये कुळीं। त्याची पायधुळी लागो मज। १ ।
तेणें त्रिभुवनीं होईन सरता। नलगे पुरूषार्था मुक्तिचारी। २ ।
नामाची आवडी प्रेमाचा जिव्हाळा। क्षण जिवावेगळा न करी त्यासी। ३ ।
नामा म्हणे माझा सोयरा जिवलग। सदा पांडुरंग तयाजवळी। ४ ।

२१८५. काय पुण्य केलें इहीं जीव जनीं। पंढरी नयनीं देखियेली। १ ।
अनंता जन्मांचें हेंचि प्रायश्चित्त। वाचे जपे नित्य रामनाम। २ ।
कोटी कुळें केलीं क्षणेंचि पावन। केल्या एक स्नान चंद्रभागे। ३ ।
शोक मोह ताप विध्वंसिला हेळां। अवलोकितां डोळां पांडुरंग। ४ ।
महा पापराशी तिहीं केल्या होळी। वाजविल्या टाळी विठ्ठलनामे। ५ ।
नामा म्हणे धन्य धन्य ते संसारीं। चालविती वारी पंढरीची। ६ ।

२१८६. जें जें पुण्य हरिनाम गजरीं। त्याचे वांटेकरी दोघेजण। १ ।
सावधान श्रोता आणि प्रेमळ वक्ता। जो भजे अनंता निर्विकल्प। २ ।
तेणें सुखें वाढे नित्य नवें। जाणती अनुभवें संतजन। ३ ।

हातीं सुदर्शन आनंदें किर्तनीं। उभा चक्रपाणि मागें पुढे। ४।
प्रीतीच्या वोरसें अभयदान देत। हृदयीं आलिंगित आपुल्या दासां। ५।
धर्म अर्थ काम मोक्ष आणि मुक्ति। टाकोनियां येती विश्रांतीसी। ६।
करूनी किर्तनाचा घोष मनी धरूनी आस। पाहतसे वास पंढरीची। ७।
नामा म्हणे धन्य धन्य ते संसारीं। न सांडिती वारी पंढरीची। ८।

२१८७. पंढरिची वारी करील जो कोणी। त्याच्या चक्रपाणि मागें पुढें। १।
लोखंड असतां सोनें झालें कैसें। समागम मिषें गुणें त्याच्या। २।
तैसें एक वेळ करीं मायबापा। चुकवीं या खेपा चौऱ्यांशींच्या। ३।
नामा म्हणे असो प्रारब्ध सरे। होई कृपण निकुरे चरणाचे। ४।

२१८८. करंटें कपाळ नाम नये वाचे। सदैव दैवाचें प्रेम नामीं। १।
जोडियेली जोडी हुंडारि दुरी। नावडे पंढरी तया जना। २।
आपण नवजे दुजिया जावों नेदी। ऐसा तो कुबुद्धि नागवितो। ३।
नामा म्हणे नाम गर्जे वारकरी। वैकुंठ पंढरी देशोदेशीं। ४।

२१८९. एक एकादशी होय पंढरीसी। सुकृताच्या रासी ब्रह्मानेणे। १।
चंद्रभागेतीरीं चतुर्भुज नरनारी। विठ्ठल कैवारी उभा असे। २।
परतुन येथें न येसी मागुता। आणिकां सर्वथा ऐसें नाहीं। ३।
क्षीरसागरींचें जिव्हार वैकुंठीचें सार। पुंडलिकें उपकार केला लोकां। ४।
नामा म्हणे आम्हां थोर लाभ झाला। तापत्रय गेला पांडुरंगा। ५।

२१९०. एकी एकादशी करितां काय वेंचे। उपवासी राहतां काय वेंचे। १।
एक तुळसीदळ वाहतां काय वेंचे। माउलीं वंदितां काय वेंचे। २।
तुज जागरणा जातां काय वेंचे। हरिहरि म्हणतां काय वेंचे। ३।
संतसमागमा जातां काय वेंचे। चरणरज वंदितां काय वेंचे। ४।
एक दंडवत करितां काय वेंचे। अपराधी म्हणवितां काय वेंचे। ५।

एक प्रदक्षिणा करितां काय वेंचे। तीर्थयात्रेसी जातां काय वेंचे। ६ ।
ऐसी निमोली भक्ति कां न करिसी निदैंवा। नामा म्हणे केशवा अनुसरे पां। ७ ।

२१९१. एकादशी दिनीं खाईल जो अन्न। सूकर होऊनि येईल जन्मा। १ ।
एकादशीं दिनीं करील जो भोग। त्यासी माता संग घडतसे। २ ।
एकदशी दिनीं खेळेल सोंगटी । काळ हाणील खुंटी गुदस्थानीं। ३ ।
रजस्त्री शोणीत सेविल्या समान। तांबुल चर्वण करील जो । ४ ।
नामा म्हणे नाहीं माझ्याकडे दोष। पुराणीं हें व्यासवाक्य आहे। ५ ।

## ❁ द्वादशीला देवांना भोजनाचे निमंत्रण देणेचा अभंग ❁

२१९२. उठोनि प्रात:काळीं अक्षता कचोळी । नित्य वोळावोळी राऊळासी। १ ।
अहो जी दातारा विनंति अवधारा। तुम्ही यावें घरा भोजनासी। २ ।
रखुमाई माते तुम्ही यावें तेथें। सामोग्री सांगातें चालवावी। ३ ।
सडासंमार्जन हें माझें करणें। उदक भरीन सुगंधेसी। ४ ।
शेषपत्रावळी काढीन उष्ठावळी। नित्य वेळोवेळीं हेचि काम। ५ ।
नामा म्हणे देवा तुमचे तुम्ही जेवा। प्रसाद तो द्यावा सेवकासी। ६ ।

## ❁ आरती ❁

२१९३. प्रेम सप्रेम आरती। गोविंदातें ओंवाळिती। १ ।
धन्य धन्य ते लोचन। नित्य करिती अवलोकन। २ ।
बाळा प्रौढा आणि मुग्धा। ओंवाळीती परमानंदा। ३ ।
नामा म्हणे केशवासी। देखुनी राहिलो ताटस्थ। ४ ।

## ❁ श्री विठ्ठलाची आरती ❁

२१९४. युगें अठ्ठाविसे विटेवरी उभा। वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा।
पुंडलिका भेटी परब्रह्म आलें गा। चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा। १ ।

जयदेव जयदेव जय पांडुरंगा । रखुमाई वल्लभा ।
राहीच्या वल्लभा । पावें जीवलगा । ध्रु० ।
तुळसी माळा गळां कर ठेवुनि कटीं । कांसे पीतांबर कस्तुरी लल्लाटीं ।
देव सुरवर नित्य येती भेटी । गरुड हनुमंत पुढें उभे राहती । २ ।
आषाढी कार्तिकी भक्त जन येती । चंद्रभागेमाजी स्नान जे करिती ।
दर्शन हेळा मात्रें तयां होय मुक्ति । केशवासी नामदेव भावें ओवाळिती । ३ ।

२१९५. घालीन लोटांगण धरीन चरण । डोळ्यांनीं पाहीन रूप तुझें । १ ।
प्रेमें आलिंगीन अनन्य पूजीन । भावें ओंवाळीन म्हणे नामा । २ ।

## ❁ अन्य आरत्या ❁

२१९६. क्षार उदक देउनी मधुरता आली । तैसी लवणस्थिति अमृत खोली ।
तयांच्या अंतरीं प्रवृत्ति मुराली । परी साखरेची मौल्यता कवणें आणिली । १ ।
जयजय आरती प्रेम सिंधुपुरा । ऐक्या ऐक्य केलें तुवां येकसरा । २ ।
नित्य प्रेमें जागती जागरणी जागा । आणिक उद्धरण जगासी सांगा ।
येकि येकादशी पुण्य आलें तें पहागा । द्वादशी लाधली ते भक्तासी मागा । ३ ।
ऐसे परउपकारीं लोळावें त्यांचे द्वारीं । तेंचि केशवध्यान येर लटिकें संसारीं ।
त्यांचे रंगणीची शीळा देवा मज करीं । नाहींतरी व्यर्थ जन्मोनि पशुपरी । ४ ।
पूर्वज उद्धरण दिसे वैकुंठ वाटे । हरिदासाचे भार मिरवती गरुड टके गोमटे ।
धन्य तृप्तितीर बरवें वाळुवंटें । वैष्णव रंगीं नाचतां हर्ष बहू वाटे । ५ ।
लाधलों समसुख काशीये जातां । विश्वनाथ प्रेम प्रेमाचिया सत्ता ।
बाणली वीरश्री पंढरीनाथा । जिकडे तिकडे देखें हरीदास गर्जतां । ६ ।
निवृत्ति सोपान हे ज्ञानेश्वरु । चांगदेव मुक्ताई वटेश्वरु ।
अवघिया अवघा साक्षात्कारु । सद्गुरु जाणा तो विसोबा खेचरू । ७ ।
त्याचे चरणीचा रजरेणु हा नामदेव शिंपा । पाहांता अनुभव सकळार्थ सोपा ।
विठ्ठल कृपेस्तव यांची मजवरी कृपा । हे एकची मूर्ति पावलों ऐसें देखोपां । ८ ।

## शेजारती

२१९७. चंदनाची ओवरी उदविली प्रकारीं। कनकाचा मंचक शेजे सुमनें वरी। १ ।
ओंवाळूं आलिया शेजे आरती। निद्रा करीं बापा लक्ष्मीपती। २ ।
संत सनकादिक यांतें आज्ञा दिजे। शुकादिक ज्ञानी यांचा नमस्कार घेइजे। ३ ।
बाळा प्रौढा मुग्धा यातें आज्ञा दीजे। मज सेवका संन्निध पहुडविजे। ४ ।
विष्णुदास नामा राहिला द्वारां नेहटी। जयजयकार करीत देतसे घिरटी। ५ ।

२१९८. गुण आणि गंभीर रणधीर। तया योग्य साजे केशव शरीर।
तैसा अमृतराज हा विसोबा खेचर। बोलोनि अबोलपणा न कल्पी ऐसा सार। १ ।
जय जय आरती या हरिदासाच्या भक्तां। दिंडी पुढें डोलत पंढरिनाथा। ध्रृ०।
हरिदासमहिमा न वर्णवे वाचा। पतितउद्धरण जाणविला साचा।
त्याचा दासीपुत्र होय तो दैवाचा। म्हणोनि संतचरणीं भाव धरावा साचा। २ ।
साधु संतां घरीं श्वान मी होईन। मग त्यांच्या पायीं नित्य लोळेन।
हरिभक्ति सोय ते मी लाभेन। तयाचें पोसणें कैं मी होईन। ३ ।
दूध देखोनि जैसी मांजर सोय। तैसे न संडवती या संतांचे पाय।
चालतां तयासंगें मदमत्सर जाय। म्हणोनि आवडी त्यांचे धरावे पाय। ४ ।
तैसी आरती हे अमृतराज। गातां उन्मेष उन्मनी सहज।
सत्रावीचें वोळलें अमृत मज। धन्य तृप्तितीर जोडलें सहज। ५ ।
यांची कृपा तरी सार्थक जन्म। नाहीं तरी निरर्थक होईल जाण।
विष्णुदास नामा म्हणे नेणते अज्ञान। केशव चरणीं ठेवुनि केलें सार्थक निर्वाण। ६ ।

२१९९. पहुडा पहुडा जी कान्हा कमळदळलोचना।
श्रमलेती शयना करा वेगीं। १ ।
पहुडावें आतां दीनानाथा। सुखशयना करावें जी। ध्रु०।
लक्ष्मीसहित देवा निद्रा करावी। राधिकेसहित देवा निद्रा करावी। २ ।
जाईजुई मोगरा मालती। कोमाइल्या पुष्पजाती जी। ३ ।

ब्रह्मादिक उभे सनकादिक उभे। आज्ञा द्यावी त्यासी जावयासी। ४ ।
गोपाळ गेले निजमंदिरा। सेवा जाणवितो नामया जी। ५ ।

## एकविध भावदर्शन

२२००. जाखाई जोखाई उदंड दैवतें। वाउगेंचि व्यर्थ श्रमतोसी । १ ।
अंतकाळीं तुज सोडविना कोणी। एक्या चक्रपाणि वांचोनियां। २ ।
मागें थोर थोर कोणें केलें तप। उद्धरीलें अमूप नारायणें। ३ ।
नामा म्हणे ऐसे बहु झाले भांड। न उच्चारिती लंड नाम वाचे। ४ ।

२२०१. मान तोडावया कर शस्त्रांचे। कठिण बहुतांचे उभारिले। १ ।
तरी न वदें न वदें आन। आन कांहीं या विठोबावांचून। २ ।
विठोबा परतें दैवत आहे म्हणती। ऐसें श्रुती स्मृती जरी बोलती। ३ ।
तरी ते अपशब्द कानीं पडों न द्यावे। पाखांडी म्हणती जरी उगेंचि असावें। ४ ।
ब्रह्मदेवेसी जालिया भेटी। तोहि जरी वदेल ऐसिया गोष्टी। ५ ।
या विठोबापरतें दैवत म्हणेल सृष्टीं। चळला पोटीं निभ्रांत जाणा। ६ ।
कोटी कोटी ब्रह्मांडें एक एक रोमीं। व्यापुनियां व्योमीं वर्ततसे। ७ ।
तो हा माझा विठोबा सर्वांघटीं सम। न सांडावें वर्म म्हणे नामा। ८ ।

२२०२. न पाहें गे माय विठाईविण डोळां। सर्वस्वें कंटाळा आणिकांचा। १ ।
विठोबाविण कांहीं नायकें मीं कानीं। जडली चरणीं चित्तवृत्ती। २ ।
आणिकांचे मार्गीं न चालोत पाय। जीव वोढे सये पांडुरंगी। ३ ।
नामा म्हणे करीं आणिकांची पूजा। न करीं गरुडध्वजा वांचूनियां। ४ ।

२२०३. भजूं एका विठोबास। आणिक न करूं अभ्यास। १ ।
येथें साधन आहे एक। पाहों विठोबाचें मुख। २ ।
वर्णूं हरीचे पवाडे। काळ लावूं देशधडे। ३ ।
नामा विष्णुदास म्हणे। ऐसें करूं हरीकीर्तन। ४ ।

२२०४. जीवप्राणें एक विठ्ठलची व्हावा । ऐसिया मी भावा रातलिया । १ ।
आवडे पंढरी आवडे चंद्रभागा । येती यमुनागंगा प्रतिदिनीं । २ ।
आवडे पद्मतीर्थ आवडे गरुडपार । राउळीं माहेर पांडुरंग । ३ ।
नामा म्हणे अहो विठाईरुक्माई । आणिकांपाशीं नाहीं चित्त माझें । ४ ।

२२०५. आमुचा विठ्ठल प्रचंड । इतरा देवांचें न पाहूं तोंड । १ ।
एका विठ्ठलावांचून । न करूं आणिक भजन । २ ।
आम्हां एकविध भाव । कदा न म्हणूं इतरां देव । ३ ।
नित्य करूं हा अभ्यास । म्हणे नामा विष्णुदास । ४ ।

२२०६. केशवापरते देव आणिक आहेती । ऐसें श्रुति स्मृति बोलतील । १ ।
तरी ते शब्द झणीं कानीं हो पडती । पाखांडी म्हणती सहावें तें । २ ।
इंद्रियांसि तुम्ही करा रे जतन । भजावा निधान श्रीविठ्ठल । ३ ।
छेदावया शिर हस्त सहस्रांचें । जरी बहुतांचे उगारिले । ४ ।
परि तूतें नाम आन न देवाचें । केशवापरतें कैंचें असे ब्रह्म । ५ ।
अंगें चतुरानना झालिया हो भेटी । तोहि जरी गोष्टी ऐसी करी । ६ ।
तरी तो चळला पोटीं ऐसें जाण । एकीं दुजेपण दावी तरी । ७ ।
ब्रह्मकटाह एक उल्लंघों शके ऐसा । वर्तोनि दाही दिशा वर्ते जरी । ८ ।
केशव नव्हे तो हो कां अनारिसा । म्हणोनियां वासा पाहों नका । ९ ।
व्यसन भक्ति प्रौढी पुरूषार्थ पांचवा । जीवाचिया जीवा सेवा ना कां । १० ।
सर्वाभूतीं आहे केशव परमात्मा । न विसंबावें वर्मा नामा म्हणे । ११ ।

२२०७. जन्मोजन्मीं आम्हीं बहु पुण्य केलें । तेव्हां या विठ्ठलें कृपा केली । १ ।
जन्मोनि संसारीं झालों त्याचा दास । माझा तो विश्वास पांडुरंगीं । २ ।
अनेक दैवतां नेघे माझें चित्त । गोड गातां गीत विठोबाचें । ३ ।
भ्रमर मकरंदा मधासी ते मासी । तैसें या देवासी मन माझें । ४ ।
नामा म्हणे मज पंढरीस न्या रे । हडसोनी द्या रे विठोबासी । ५ ।

२२०८. शास्त्राचें हें सार वेदाचें गव्हर । उतराया पार आणिक नाहीं । १ ।
विठ्ठल विठ्ठल म्हणा उघडा मंत्र जाणा । कळिकाळ अंकणा होईल तुम्हां । २ ।
न करावें खंडन अखंड उच्चारण । तप अनुष्ठान न लगे तुम्हां । ३ ।
सिद्धीचें हें सार मुक्तीचें माहेर । उतरावया पार दुजें नाहीं । ४ ।
विठ्ठलापरतें काय करिसी दैवत । परब्रह्म निरुतें पंढरीये । ५ ।
सिद्धीचें सहज भक्ताचें हें बीज । केशवीं दिले मज म्हणे नामा । ६ ।

## दृढभाव दर्शन

२२०९. जें जें घडेल तें तें घडो । देह राहो अथवा पडो । १ ।
नाम न सोडीं सर्वथा । दीनबंधू पंढरीनाथा । २ ।
जैसा जैसा असेल भोग । तैसा तैसा घडेल योग । ३ ।
नामा म्हणे केशवातें । जे घडेल तें घडो या देहातें । ४ ।

२२१०. तुझिये चरणीं असती दोनी भाव । तरीच हा जीव नरककुंडीं । १ ।
बोल बोले एक मनीं असे आणिक । तरी तयासी देख दोन बाप । २ ।
तुजवीण सुख आणिकांचें मानी । तरी मज जननी दोन देवा । ३ ।
नामा म्हणे माझा सत्याचा साहाकारी । आस मी न करी आणिकांची । ४ ।

२२११. तुझिया चरणाचें तुटतां अनुसंधान । जाईल माझा प्राण तत्क्षणीं । १ ।
मग हें ब्रह्मज्ञान कोणापें सांगसी । विचारी मानसीं पांडुरंगा । २ ।
वदनीं तुझें नाम होतांची खंडणा । शतखंडरसना होईल माझी । ३ ।
सांवळें सुंदर रूप पाहतां तुझे दृष्टी । न देखतां उन्मळती नयन हे । ४ ।
तुज परतें साध्य आणिक नाहीं साधन । साधक माझें मन होईल भ्रांत । ५ ।
नामा म्हणे केशवा अनाथाचा नाथ । झणीं माझा अंत पाहसी देवा । ६ ।

२२१२. आतां होणार तें हो कां पंढरीनाथा । न सोडीं सर्वथा चरण तुझे । १ ।
हृदयीं तुझें ध्यान मुखीं जपें नाम । हाचि नित्यनेम सर्व माझा । २ ।

आम्हीं तुझी देवा धरियेली कास। न करीं उदास पांडुरंगा। ३ ।
नामा म्हणे देवा भक्तजनवत्सला। क्षण जीवावेगळा न करीं मज। ४ ।

२२१३. देवा माझें मन आणि तुझे चरण। एकत्र करोन दिधली गांठी। १ ।
होणार तें हो गा सुखें पंढरीनाथा। कासया शिणतां वांयांविण। २ ।
माझिया अदृष्टीं ऐसेंचि पैं आहे। सेवावे तुझे पाय जन्मोजन्मीं। ३ ।
असतां निरंतर येणें अनुसंधानें। प्रारब्ध भोगणें गोड वाटे। ४ ।
हृदयीं तुझें रूप वदनीं तुझें नाम। बुद्धि हे निष्काम धरिली देवा। ५ ।
नामा म्हणे तुझीं पाउलें चिंतीतां। झाली कृतकृत्यता जन्मोजन्मीं। ६ ।

२२१४. तुजवांचुनि कांहीं गोड न वाटे जीवा। तुझे पाय मज दिव्य केशवा। १ ।
लौकिकापासुनि कधीं सोडविसी। सांग हृषीकेशी उघडोनि। २ ।
तुझे पाय दिव्य तुझे पाय दिव्य। तुझे पाय दिव्य रे दातारा। ३ ।
नामा म्हणे जिव्हें काढीन मी रवा। तुझे पाय मज दिव्य केशवा। ४ ।

२२१५. तुझिया चरणाची न संडीं मी आस। होत गर्भवास कोटिवरी। १ ।
हेंचि मज देईं जन्मजन्मांतरीं। वाचे श्रीहरी नाम तुझें। २ ।
तुझिया नामाचा करीन विसांवा। मनाचा हा ठेवा तुझे पायीं। ३ ।
नामा म्हणे माझे हेचि मनोरथ। होईन शरणागत जन्मोजन्मीं। ४ ।

२२१६. तुटोनि आकाश पडेलहि शिरीं। न सोडीं मी हरी पाय तुझे। १ ।
तुझे पाय गोड तुझे पाय गोड। तुझे पाय गोड सर्वकाळ। २ ।
डोंगरासांगातें कोण करी वाद। वाउगी उपाध आहे आम्हां। ३ ।
नामा म्हणे तुझें थोरपण काय। कायसे उपाय सांग आम्हां। ४ ।

२२१७. काळ देहासी आला खाऊं। आम्ही आनंदें नाचूं गाऊं। १ ।
कोणे वेळे काय गाणें। हें तों भगवंता मी नेणें। २ ।

टाळ मृदंग दक्षिणेकडे । माझें गाणें पश्चिमेकडे । ३ ।
नामा म्हणे बा केशवा । जन्मोजन्मीं द्यावी सेवा । ४ ।

२२१८. श्रीहरि श्रीहरि ऐसें वाचे म्हणेन । वाचा धरिसी तरी श्रवणीं ऐकेन । १ ।
श्रवणीं दाटसी तरी मीं नयनीं पाहीन । ध्यानीं मीं ध्याईन जेथें तेथें । २ ।
जेथें जाय तेथें लागला हा आम्हां । न संडी म्हणे नामा वर्म तुझें । ३ ।

२२१९. मुक्तिपद मी गा अभिलाषींन चित्तीं । झणीं अंतरती पाय तुझे । १ ।
निर्वासना चित्तें भजन तुझें करितां । झणीं सायुज्यता देसी मज । २ ।
मग मी काय करूं वैकुंठनायका । ऐशा प्रेमसुखा कोठें पाहूं । ३ ।
ध्यान सुखें करूं पाहें हृदयकमळीं । कीटकी ऐसी आळी करिशी झणीं । ४ ।
संकल्पें यावें वाटे चरणा जवळी । विकल्प काजळीं झणीं देशी । ५ ।
नामा म्हणे आतां कांहींच मी न करीं । मज होत कोटीवरी गर्भवास । ६ ।

२२२०. देह जावो हेचि घडी । पाय हरीचे न सोडीं । १ ।
क्लेश होत नानापरी । मुखीं रामकृष्ण हरी । २ ।
क्रीडो वैष्णवाचे मेळीं । हाक केशव आरोळी । ३ ।
नामा म्हणे विठोबासी । जें तें घडो या देहासी । ४ ।

२२२१. देह जावो अथवा राहो । पांडुरंगी दृढ भावो । १ ।
चरण न सोडीं सर्वथा । तुझी आण पंढरीनाथा । २ ।
वदनीं तुझें मंगळनाम । हृदयीं अखंडित प्रेम । ३ ।
नामा म्हणे केशवराजा । केला नेम चालवीं माझा । ४ ।

## श्री क्षेत्र पंढरीतून परततानांचे अभंग

२२२२. बहु दिवस होतो तुमचे गांवीं । आतां कृपा असों द्यावी । १ ।
आम्ही जातों आपुल्या गांवा । विठोबा लोभ असों द्यावा । २ ।
तुझे पायीं माझें मन । तुझे चरण माझा प्राण । ३ ।

लिखित पत्र पाठवावें । माझें स्मरण असों द्यावें । ४ ।
नामा म्हणे जी केशवा । अखंड प्रेमभाव द्यावा । ५ ।

२२२३. आतां येतों स्वामी आम्ही । कृपा असों द्यावी तुम्ही । १ ।
बहु दिवस सांभाळ केला । पुन्हा जन्म नाहीं दिला । २ ।
थोर सुकृताच्या राशी । तुमचे पाय मजपाशीं । ३ ।
ऐसा नामदेव बोले । ऐकोनी दासी जनी डोले । ४ ।

२२२४. आषाढीं कार्तिकीं विसरूं नका मज । सांगतसें गुज पांडुरंग । १ ।
पतितपावन मी तो आहें खरा । तुमचेनि बरा दिसतसें । २ ।
तुम्ही जातां गांवा हुरहुर माझे जिवा । भेटाल केधवां मजलागीं । ३ ।
धांवोनियां देव गळां घाली मिठी । स्फुंदस्फुंदून गोष्टी बोलतसे । ४ ।
तिहीं त्रिभुवनीं मज नाही कोणी । म्हणे चक्रपाणी नामयासी । ५ ।

## नाममहिमा

२२२५. नामाचा महिमा नेणेची पैं ब्रह्मा । म्हणोनियां कर्मा अनुसरला । १ ।
नाम हेंचि कर्म नाम हेंचि धर्म । केशव हेंचि वर्म सांगितलें । २ ।
नामे शुद्ध स्नान नामे शुद्ध संध्या । नामाविणें वेदा आणिक नाहीं । ३ ।
करितां आचमन केशव नारायण । करिती उच्चारण आधीं हेंची । ४ ।
लग्नाचिये काळीं म्हणती सावधान । लक्ष्मीनारायण चिंतन करा । ५ ।
देहाचिये अंतीं प्रायश्चित्त देती । शेवटीं वदविती रामनाम । ६ ।
करिती पितृश्राद्ध कर्म आचरती । शेवटीं म्हणती एको विष्णु । ७ ।
ऐसिया नामापरतें नाहीं सार । गिरिजेशी शंकर उपदेशी । ८ ।
नामें होय गति नामें होय मुक्ति । नामयाचे चित्तीं रामनाम । ९ ।

२२२६. नामाचा महिमा कोण जाणे सीमा । चतुर्मुख ब्रह्मा नेणे कांहीं । १ ।
संसारा आलिया हेचि आहे जोडी । अखंड घ्यावी गोडी हरिनामें । २ ।

सहस्रमुखें शेष वाखणितां कीर्ती । नाहीं तया तृप्ति आजीवरी। ३ ।
पशु पक्षी तृण कीटक अपार। नामें गेले पार उतरोनि। ४ ।
कापुराचे राशी पडे अग्निकण । तैसें नाम जाण पातकासी । ५ ।
नामाग्नीनें दोष जळती एकसरा । कैवल्य ये घरा बसल्या ठायीं। ६ ।
नामा म्हणे धन्य नामाचा प्रताप। ध्याती एकरूप देवभक्त। ७ ।

२२२७. नामाचा प्रताप काय सांगूं वाचे। अक्षय सुखाचें स्थान दावी । १ ।
नामाविण कांहीं नाहीं नाहीं सार। साधावें सत्वर भलेनो हें। २ ।
अजामेळ पाहा आजन्म पातकीं। नामें गेला सेखीं वैकुंठासी। ३ ।
कुंटिणी जारणी शुकामिसें गाय। वैकुंठासी जाय तत्क्षणीं । ४ ।
पाहा वाल्ह्या कोळी उफराट्या नामें। भविष्य संभ्रमें वाखाणिलें । ५ ।
नामा म्हणे किती सांगावा निर्धार। साधन सोपारें नाम एक । ६ ।

२२२८. नामीं नारायण । होय भक्तांचे आधीन। १ ।
न मागतां भक्ती । नामापासीं चारी मुक्ती। २ ।
भुलों नये जाण । नाम वैकुंठीं निशाण। ३ ।
नामा म्हणे ऐसे प्राणी । सम होती नारायणीं । ४ ।

२२२९. नामामृत गोडी आहे वैष्णवांसी। येरां प्राकृतांसी कळेनाची। १ ।
प्राकृत हे जन भुलले विषयीं । नामाचिया गांवीं कैसे जाती। २ ।
नामीं चित्त व्हावें जावें तेव्हां गांवा। मग नाम ठेवा तेथें कैंचा। ३ ।
नाम तेंचि जाहालें वर्ण रूपातीत। अनाम स्वतंत्र स्वयंभ तो। ४ ।
नामदेव म्हणे नाम हें सुलभ। अभक्तां दुर्लभ नानापरी। ५ ।

२२३०. आगमीं नाम निगमीं नाम। पुराणीं नाम केशवाचे। १ ।
अर्थीं नाम पदीं नाम। धृपदीं नाम त्या केशवाचें। २ ।
अनुभवें भावें कपटें प्रपंचें। परि हरीचें नाम येऊं दे वाचे। ३ ।
नाम व्हावें नाम व्हावें। नाम व्हावें त्या केशवाचें। ४ ।

ऐसें नाम बहु सुंदर । नामीं तरले लहान थोर । ५ ।
नामा म्हणे अंतर । पडों नेदीं याउपर । ६ ।

२२३१. नाम घेतां भगवंताचें । पाश तुटती भवाचे । १ ।
जे जे नामीं रत झाले । ते ते केशवें तारिले । २ ।
गणिका दुराचारी । नामें तारिली अहिल्या नारी । ३ ।
महापापी अजामेळ । तोहि तारिला चांडाळ । ४ ।
नामें गजेंद्र तारिला । देवें मोक्षपदासी नेला । ५ ।
नाम घेतसे पांचाळी । उभा बाप वनमाळी । ६ ।
नामा सांगे भाविकांसीं । नाम घ्यारे अहर्निशीं । ७ ।

२२३२. नाम उत्तम उत्तम । वाचे बोलूं पुरूषोत्तम । १ ।
नाम साराचे हे सार । शरण येती यमकिंकर । २ ।
नाम घेता हो पांचाळी । नामे तरला वाल्हा कोळी । ३ ।
नामे गजेंद्र तारिला । मोक्षपदी जागा त्याला । ४ ।
नामा म्हणे भाविकाशी । नाम घ्यावे अहर्निशी । ५ ।

२२३३. शिव हलाहलें तापला । तोहि नामें शीतळ झाला । १ ।
नाम पावन पावन । याहूनि पवित्र आहे कोण । २ ।
शिवासी नामाचा आधार । केला कळिकाळ किंकर । ३ ।
मरण झालें काशीपुरीं । तेथें नामचि उद्धरी । ४ ।
अठरा पुराणांची पोथी । नामाविण नाहीं रीती । ५ ।
नामा म्हणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोईरें । ६ ।

२२३४. तुझें नाम नारायणा । फोडी पाषाणासी पान्हा । १ ।
नाम घेतां वाल्मीकानें । टोणप्यासी फुटलीं पानें । २ ।
अजामेळ पापराशी । नामें नेला वैकुंठासी । ३ ।
नाम पावन पावन । नामा म्हणे हेंचि धन्य । ४ ।

२२३५. भक्ति हे पोर्णिमा बोध तो चंद्रमा । आनंद सिंधुप्रेमा भरतें आलें। १ ।
सिंधुचें गर्जन राम नाम थोर। वृत्ति लहरी फार थोरावती। २ ।
नामा म्हणे येथें जाला जो सुस्नांत। तोचि जीवनमुक्त देवा ऐक्य। ३ ।

२२३६. नाम हेंचि आदि नाम हें अनादी। नामें निरुपाधी सेवा तुझी । १ ।
नाम हेंचि सिद्धि नाम हे समाधी । नामें भवव्याधि निवारेल। २ ।
नाम सर्वांघटीं सानाची त्रिपुटी। नाम हें संकटीं सोडवील। ३ ।
नाम हें पूजन नाम हेंचि पूजा। नाम भावें भजा जयें कैसें। ४ ।
नाम हें आरत्र नाम हें परत्र। नाम तें सर्वत्र शोभिवंत। ५ ।
नामा म्हणे नाम आरोधी विरोधी। सेवितां भवाब्धि आटोनि जाये। ६ ।

२२३७. तप तीर्थ दान हें सर्व कुवाडें। नाम एक वाड केशवाचें। १ ।
मुमुक्षु साधकीं सदा नाम गावें। तेणेंचि या व्हावें अखंडित। २ ।
विपत्तीचे बळें न होतां विन्मुख। नाममात्र एक धरा वाचे। ३ ।
जीवन्मुक्त शुक मुनि ध्रुवादिक। तयासी आणिक ध्यास नाहीं। ४ ।
नामयाची वाणी अमृताची खाणी। घ्यावी आतां धणी सर्वत्रांहीं। ५ ।

२२३८. आदरें जपतां केशवाचें नाम। वैकुंठ हें धाम पायां पडे। १ ।
आणीक सायास करूनि कदापि। चौऱ्यांशींच्या सिंपीं गुंफों नका। २ ।
याजसाठीं हरिनाम निरंतरी । तारील निर्धारीं भाक माझी। ३ ।
भावभक्ति क्रिया नलगे आणिक। कीर्तन तारक म्हणे नामा। ४ ।

२२३९. गाणें गाती रे सुगड। तयां हांसति दुघड। १ ।
नाम गोड नाम गोड। होय जन्माचा निवाड। २ ।
हांसे त्यासी हांसूं द्यावें। गात आपण असावें। ३ ।
नामा म्हणे जे हांसती। त्यांचीं कुळें नरका जाति। ४ ।

२२४०. मन करी आपुलें वासना ते निवारी। सर्व हेंचि हरी भजत जाय। १।
ब्रह्मनाम गोविंद नाहीं भेदाभेद। तुटे भवबंध हरिनामें। २।
सांडीं लगबग न करीं तूं आळस। विठ्ठलीं विश्वास असों देणें। ३।
नामा म्हणे ब्रह्म हेंचि निरूपण। सर्व काम पूर्ण याच्या नामें। ४।

२२४१. व्रत तप दान हवन पूजन। न लगे साधन नाम म्हणतां। १।
रामकृष्ण हरी मुकुंद मुरारी। जिव्हे क्षणभरी न विसंबें। २।
कळिकाळ दारुण करीतसे विघ्न। परजी नारायण नाम जिव्हे। ३।
शरण आलों जिव्हे तुवां नुपेक्षावें। नामा म्हणे गावें हरीनाम। ४।

२२४२. उपदेश विव्हळ न कळे याचा अर्थ। वांयांची हा स्वार्थ प्रपंचाचा। १।
सांडीं हा प्रपंच मिथ्या लवलाहो। विठ्ठल हा टाहो नित्य करीं। २।
हरी हरी भजन भज दयाशीळ। होसील निर्मळ ब्रह्मरूप। ३।
सर्व हा आकार हरीचें शरीर। मायेचा विकार भुलों नको। ४।
आप तेजीं ब्रह्म हरी माझा सम। आदि अंतीं नेम विठ्ठल हरी। ५।
नामा म्हणे उपमा काय द्यावी यासी। नाम तारी सर्वांसी कलिमाजी। ६।

२२४३. अनंत जन्में मेळवितां दुर्लभ। तो प्राणवल्लभ शंकराचा। १।
वेदशास्त्र मंथुनी काढियेलें सार। ब्रह्मादिकां पार रामनामें। २।
स्वर्गींचे देव चिंतिताती मानसी। भेटी आम्हां कैसी पांडुरंगी। ३।
नामा म्हणे केशवाचें नाम उच्चारितां। विघ्नासी भंगितां नवल काय। ४।

२२४४. नाम फुकाचें चोखट। नाम घेतां नलगे कष्ट। १।
पडशील ज्या सागरीं। रामनामें आत्मा तारी। २।
पुत्रभावें स्मरण केलें। तया वैकुंठासी नेलें। ३।
नामा हें महिमान जाणे। घेतो विठ्ठलाची आण। ४।

२२४५. नामाचें चरित्र सदा अतिगोड। तीर्थें काय चाड नामामात्रें। १ ।
ऐसा दृढ मनीं करावा विचार। नाम परिकर कलियुगीं। २ ।
नामा म्हणे नाम अनादि अक्षर। उभा कटीं कर भक्तांसाठीं। ३ ।

२२४६. अनंत ब्रह्मांडें व्यापक तें नाम। अनादि निष्काम विश्वंभर। १ ।
तोचि कृष्ण परब्रह्म द्वारकेसी। पांडवां मानसीं ठसावला। २ ।
ठसावला तोचि पाहावा अनुभव। पांचालागीं ठाव मग कैंचा। ३ ।
नामदेव म्हणे देव संपूर्ण आघवा। नामाचिया गांवा सींव नाहीं। ४ ।

२२४७. ज्ञान व्हावें आधीं ओळखावें नांवा। मग जावें गांवा तयाचिया। १ ।
या नामाचें मूळ त्या माजी जो धाला। प्रपंच्याचा घाला मग नाहीं। २ ।
नाम गावें प्रपंच सर्व आहे नाम। ब्रह्मानंदें प्रेम घनदाट। ३ ।
नामदेव म्हणे नंदाचिया घरीं। होता एक हरि दुजें नाम। ४ ।

२२४८. साधनांत सोपें नाम हें केवळ। यावीण सकळ शीण वांयां। १ ।
धरारे धरा नाम विठोबाचें। तेणें अज्ञानाचें मूळ नासे। २ ।
नाम तारी फार पुराणीं वर्णिलें। नामचि केवळ आत्मसत्ता। ३ ।
नामा म्हणे नामीं रंगला सुरंग। अंगें स्वयमेव पांडुरंग। ४ ।

२२४९. एकट येकला सर्व हें सकळा। आपणची झाला विश्व हरी। १ ।
न कळे याची माव कैसा आहे भाव। सर्वाभूतीं देव गीता सांगे। २ ।
भूतदया धरा भजावें श्रीधरा। नामा एका स्मरा विठ्ठल ऐसें। ३ ।
नामा म्हणे देव पंढरीपाटणीं। पावेल निर्वाणीं नाम घेतां। ४ ।

२२५०. जीव शिव ग्रामीं मीतूंपण पाहीं। हा गौरव कांहीं नाहीं नामीं। १ ।
नाहीं चतुर देह तूर्या हे उन्मनीं। स्वयंभु ते खाणी निजनामाची। २ ।
नामीं जडे चित्त तेथें काय उणें। लज्जित साधनें नाना जाहालीं। ३ ।
नामा म्हणे नामीं मीतूंपण। नाहीं कांहीं आन सर्व तेंची। ४ ।

२२५१. आकारिक नाम जीवानें ठेविलें। शिवानें तें केलें निर्विकल्प। १ ।
जीव शिव दोन्ही विराले ज्यामाजी। तें नाम सहजी आद्य आहे। २ ।
तया नामाविण जावयासी ठाव। नाहीं दुजा भाव तिळ भरी। ३ ।
नामदेव म्हणे नाम घनदाट। प्रपंच निघोट नामापरी। ४ ।

२२५२. नामें सदां शुद्धि प्राणिया होतसे। नामापाशीं असे भुक्तिमुक्ति। १ ।
नामा ऐसें सोपें नाहीं त्रिभुवनीं। नाम संजीवनी साधकांसी। २ ।
नामें भक्ति जोडे नामें कीर्ति वाढे। नामें सदा चढे मोक्ष हातां। ३ ।
यज्ञ दान तप नामें आलीं हातां। नामें सर्व सत्ता प्राप्त होय। ४ ।
नामा म्हणे सदा नाम ज्याचे मुखीं। नाहीं याच्या तुकीं दुजा कोणी। ५ ।

२२५३. कीटकीतें भयें स्वयें भृंगी घ्यातां। तैसा तूं अनंता करीं आतां। १ ।
भजनें पाठविलें श्रीहरि रूपासी। नेतो वैकुंठासी नारायण। २ ।
नाम नारायण अंतीं उद्धारक। नामा म्हणे देख भाक माझी। ३ ।

२२५४. तान्हेलों भुकेलों। तुझेनि नामें निवालों। १ ।
तहान नेणें भूक नेणें। अखंड पारणें नामीं तुझ्या। २ ।
अमृतलिंग केशव हा चित्तीं। तेणें नामया तृप्ति अखंडित। ३ ।

२२५५. मोह भुजंगें डंखिलें। विषय लहरी झांकोळिलें। १ ।
धांव धांव चक्रपाणी। आणिका न करवे धांवणी। २ ।
नामा म्हणे निर्विष झालों। केशव नामें उपचारिलों। ३ ।

२२५६. नामें तरूं अवघे जन। यमपुरीं घालूं वाण। १ ।
करू हरिनामकीर्तन। तोडूं देहाचें बंधन। २ ।
करूं हरिनामाचा घोष। कुंभपाक पाडूं ओस। ३ ।
ऐसा नामा यशवंत। विठोबाचा शरणागत। ४ ।

२२५७. यज्ञ याग दान व्रत उद्यापन। हें नेणें मी साधन काय करूं। १ ।
जप तप होम स्वधर्माचरण। नव्हे तीर्थाटण काय करूं। २ ।
गये पिंडदान प्रयागींचें स्नान। कर्म अनुष्ठान नव्हे मज। ३ ।
भक्ति उपासना देवाचें पूजन। ध्यान उपोषण नव्हे मज। ४ ।
पृथ्वीचें भ्रमण अनुताप संपूर्ण। सारासार खूण नकळे कांहीं। ५ ।
पुण्य नाहीं गांठीं पापाचें संचित। परम पतीत वाटे मज। ६ ।
माझा देह आहे पातकाचा थारा। मी अपराधी खरा कळलें मज। ७ ।
पुराणप्रसिद्ध नाम तुझें सार। ऐसें निरंतर बोलताती। ८ ।
अन्यथा वचन नव्हे हें प्रमाण। तरी ब्रीदें जाण सांडविलीं। ९ ।
तुम्हां ब्रीद आपुलें जतन करणें। तरी नारायणें सांभाळावें। १०।
नामेविण कांहीं आम्हांपाशीं नाहीं। विचारोनि पाहीं पांडुरंगा। ११।
धन वित्त सर्व आमुची हे जोडी। नामा म्हणे गोडी नामीं तुझ्या। १२।

२२५८. लपलासि तरी नाम कैसें नेसी। आम्ही अहर्निशीं नाम गाऊं। १ ।
आम्हापासुनियां जातां नये तुज। तें हें वर्म बीज नाम घोकूं। २ ।
आम्हासी तों तुझें नामचि पाहिजे। मग भेटी सहजें देणें लागे। ३ ।
भोळे भक्त आम्ही चुकलों होतो वर्म। सांपडलें नाम नामयासी। ४ ।

२२५९. संसारसागरीं पडलों महापुरीं। सोडवण करीं देवराया। १ ।
नामाची सांगडी देऊनियां मातें। वैकुंठावरुतें नेऊनि घालीं। २ ।
काम क्रोध मगर करिती माझा ग्रास। झणीं तूं उदास होसी देवा। ३ ।
नामा म्हणे झणीं मोकलिसी मातें। नाम तुझें सरतें धरलें एक। ४ ।

२२६०. नामचि जो जाणे आनु कांहीं नेणे। संसार नामाविणें जाईजेना। १ ।
नाम स्मरे त्यासी संसार नाहीं। खुंटली ते पाहीं येरझार। २ ।
नाम न म्हणे त्याचें जळों झालेपण। आळसी वांयाविण संसारासी। ३ ।
नामा म्हणे मज नामींच सौरसु। नाम स्मरे हृषिकेशु त्यासी पावे। ४ ।

२२६१. क्रिया कर्म धर्म तूंचि होसी माझें। राखेन मी तुझें द्वार देवा। १ ।
मज पाळिसी तैसें पाळीं दीनानाथा। न सोडीं सर्वथा नाम तुझें। २ ।
गाईन तुझें नाम हृदयीं धरोनि प्रेम। हाचि नित्य धर्म सर्व माझा। ३ ।
नामा म्हणे विठो कृपेच्या सागरा। तूं आम्हां सोइरा आदिअंतीं। ४ ।

२२६२. एकांत एकला सर्व आहे हरी। ऐसेंचि अहर्निशीं ध्याइजे तूं। १ ।
सर्वांभूतीं विठ्ठल आहे आहे साचें। हें तंव वेदींचें वचन जाण। २ ।
मार्ग हाचि सोपा गेले मुनिजन। जनीं जनार्दन हाचि भावो। ३ ।
नामा म्हणे नाम मंत्र उच्चारण। सर्वही कारण होईल तुझें। ४ ।

२२६३. प्रसन्न वदन सदा वीळ आहे। कां करिसी उपाय कर्म जाड। १ ।
मंत्रांचा पैं मंत्र बीज नाम हरीचें। तेंचि हें शिवाचें रामनाम। २ ।
तुटेल भवकंद जासील निजपंथें। झणीं तूं दुश्चितें करीसी चित्त। ३ ।
नामा म्हणे भजन सर्व हरीचें करीं। होईल बोहरी प्रपंचाची। ४ ।

२२६४. एकतत्त्व हरी निर्धार तूं धरीं। प्रपंच बोहरी एका नामें। १ ।
अच्युत गोविंद परमानंद छंद। नित्य तो आल्हाद हरिनामीं। २ ।
ऐसा तूं विनटें हरी नामपाठें। जासील वैकुंठें नश्वरिता। ३ ।
नामा म्हणे तत्त्व नाम गोविंदाचें। हेंचि धरीं साचें येर वृथा। ४ ।

२२६५. सर्वांमाजी सार नाम श्रीहरीचें। अखंडीत वाचे जप करीं। १ ।
निशिदिनीं हृदयीं ध्यातो शूळपाणी। पाविजे निर्वाणीं मोक्षपद। २ ।
चार सहा आणि अठराही वर्णिती। नामे निजप्राप्ती अर्धक्षणी। ३ ।
व्यासादिकी नाम साधियेले दृढ। प्रपंच काबाड निरसीलें। ४ ।
नामा म्हणे ऐसें स्मरें कां निधान। पावेल साधन वैकुंठींचें। ५ ।

२२६६. विठ्ठलासी पाहे विठ्ठलासी ध्याये। विठ्ठलासि गाये सर्वकाळ। १ ।
विठ्ठल हा वृत्ति विठ्ठल जपणें। चित्त वित्त मनें सर्वकाळ। २ ।

सबाह्य विठ्ठल दाटे घनवट। दशदिशा अफाट विठ्ठलचि। ३ ।
नामा म्हणे तुम्ही विठ्ठल होऊन। अभंग भजन करीतसां। ४ ।

२२६७. नरहरी नाम नुचारीती। त्यांचे तोंडी पडे माती। १ ।
ज्याच्या भाव नाही चित्ती। लटिका तनाना करिती। २ ।
बोळावा खाती। जिव्हां साखरकांडी ती। ३ ।
नामा म्हणे शिकऊ किती। ते प्राणी नरका जाती। ४ ।

२२६८. ज्याचे मुखीं नाम तोचि एक धन्य। त्याचें शुद्ध पुण्य इये जनीं। १ ।
नामसंकीर्तन नित्य नाम वाचे। दहन पापाचें एका नामें। २ ।
ऐसा जो अखंड जपे रामनाम। नाहीं तयासम दुजें कोणी। ३ ।
नामा म्हणे नाम विठ्ठलाचें जपा। हाचि मार्ग सोपा परब्रह्मीं। ४ ।

२२६९. सकळ साधनाचे सार। रामकृष्ण हा उच्चार। १ ।
म्हणा गोविंद नरहरी। सकळ जीवा तोचि तारी। २ ।
नाम घेतां हरी माधव। तरताती सकळ जीव। ३ ।
नामा म्हणे केशवाचे। धन्य जीवित वैष्णवांचें। ४ ।

२२७०. तरले तरती हा भरंवसा। पुढती न येती गर्भवासा। १ ।
वाट सांपडली निकी। विठ्ठल नाम ज्याचे मुखीं। २ ।
तीर्थे इच्छिती चरणींचे। रज नामधारकाचे। ३ ।
प्रायश्चित्त सांडोनी प्रौढी। झाली दीन रूपें बापुडीं। ४ ।
रिद्धी सिद्धी महाद्वारीं। मोक्ष वोळंगण करी। ५ ।
नामा म्हणे सुख निधान। नाम पतित पावन। ६ ।

२२७१. नामें तो सरता नामें तो परता। नामें पंढरिनाथा भेटविलें। १ ।
नाम हेंचि तारी नाम भवसागरीं। उतरी पैलतिरीं नाम तुझें। २ ।
नाम तें अंजन नामें बोधे मन। नामेंचि निधान चांगया झाला। ३ ।

मार्गीं जातां तुम्ही उगेंचि नसावें। वाचेसी म्हणावें रामकृष्ण। ४ ।
रामकृष्ण हरि मुकुंदमुरारि। केशव नरहरि नारायण। ५ ।
ऐसा हा सतत आठव नामाचा। नामा म्हणे कैंचा दोष तया। ६ ।

२२७२. जीवन्मुक्त केले नामाचे गजरीं। सेवक अधिकारी विठोबाचे। १ ।
काय उतराई होऊं तुज देवा। उदारा केशवा मायबापा। २ ।
अंतरीं देऊनि प्रेमाचा जिव्हाळा। मुक्तीचा सोहोळा भोगविसी। ३ ।
नामा म्हणे वेदा न येसी अनुमाना। वर्णिता पुराणा ठक पडे। ४ ।

२२७३. प्रेमफांसा घालुनि गळां। जिते धरीलें गोपाळा। १ ।
एक्या मनाची करूनि जोडी। विठ्ठल पायीं घातली बेडी। २ ।
हृदय करूनि बंदिखाना। विठ्ठल कोंडुनी ठेविला जाणा। ३ ।
सोहं शब्दें मार केला। विठ्ठल काकुलती आला। ४ ।
नामा म्हणे विठ्ठलासी। जीवें न सोडीं सायासीं। ५ ।

२२७४. दंभें गर्वें मदें घेरलेंसे भारी। अनुसरलों केसरी पंचानना। १ ।
तूंतें वेद नेणें तूंतें शास्त्र नेणें। तुझें नाम नेणें गातूं असें। २ ।
त्रिविधा तूं पारु दोहींचा वृत्तांतु। सत्व राहे तीतू जयालागीं। ३ ।
निर्गुण निराकार केशव उदार। नामा म्हणे पार उतरील। ४ ।

२२७५. भोगावरी आम्हीं घातिला पाषाण। मरणामरण आणियेलें। १ ।
नाहीं यासी पतन न होय बंधन। नित्य हेंचि स्नान रामनामीं। २ ।
नामा म्हणे भाव सर्वां भूतीं करा। आणिक पसारा घालूं नका। ३ ।

२२७६. नमन करीन द्वारकानायका। पांडव पाळका देवराया। १ ।
आतां मी गाईन गुण नामकीर्ति। जेणें चारी मुक्ति दासी होती। २ ।
साधक लोकांसी हेंचि पैं साधन। ब्रह्म सनातन वश होय। ३ ।
नामा म्हणे सर्व साराचें हें सार। जेणें निरंतर सुख वाटे। ४ ।

२२७७ नाम हें अमृत भक्तांसी लाधलें । आपण घेतलें बौध्यरूप। १ ।
नाम हें आळवा नाम हें आळवा। होईल दोहावा कामधेनु। २ ।
न बाधेल विघ्न प्रपंच हे भान। नाम हेंचि खूण वैकुंठींची। ३ ।
नामा म्हणे जडजीव ब्रह्म असे सर्व। हा गीतेमाजी भाव सांगितला। ४ ।

२२७८. तपें दानें व्रतें यज्ञाचिया कोडी। तुकितां झाली थोकडीं हरिनामें। १ ।
न पुरे त्यांसी घातलीं त्रिभुवनींचीं तीर्थें। नयेची पुरतें रामनामेंसी। २ ।
नाहीं या जीवाचें बोलणें शिवाचें। उपदेशिलें वाचे शक्तीप्रती। ३ ।
नाम नाहीं वाचे हाचि पैं निषेधु। विधि हा गोविंदु स्मरलिया। ४ ।
श्रेष्ठ सर्व नाम शिवाचें बोलणें। युक्ति अनुमानें न बोलें कांहीं। ५ ।
नामेंचि भक्त ते पावले अपार। नामें पतित नर उद्धरले। ६ ।
नामें पशु गजेंद्राचा तो उद्धार। वाल्मिकें विचार हाचि केला। ७ ।
गगनीं धुरु केला अढळ नामें देखा। नामेंचि गणिका उद्धरली। ८ ।
नामें ते आपदा न बाधी प्रल्हादा। मुखीं नाम सदा उच्चारितां। ९ ।
कृपाळु नाम पैं यज्ञ हाचि सार। भीष्में युधिष्ठिरा उपदेशिलें। १०।
हरिनामापरतें नाहीं विचारितां। नवमाध्यायीं गीता कृष्ण सांगे। ११।
सकल अमृत श्रीहरिचें नाम। त्यामाजि उत्तम रामनाम। १२।
म्हणोनि सदाशिवें धरिलें मानसीं। हेंचि गिरजेसी उपदेशिले। १३।
तारक ब्रह्ममंत्र रामनाम जाण। विश्वनाथ श्रवण करीतसे। १४।
कीर्तन श्रवण हेंचि पैं हो काशी। म्हणोनि मानसीं राम जपा। १५।
विरंची सकळ शास्त्र विचारितां। हरिनामापरता मंत्र नाहीं। १६।
कळिकाळा त्रास हरिनाम कीर्तनें। पतितपावन प्राणी होय। १७।
कलियुगीं धर्म हरीचें हें नाम। शुकदेवें म्हणोन वाखाणिलें। १८।
नामयाचा स्वामी पंढरीचा रावो। रुक्माईचा नाहो गाऊं गीतीं। १९।

२२७९. भक्ति करूनियां कोण वांयां गेला। सांगा हो विठ्ठला निवडुनी। १
द्वापाराचे अंतीं नामची सुकृत। अद्यापि निश्चिंत चालतसे। २
नाम ऐकतां तरती निर्धारीं। व्याख्यान श्रीधरी टीकाकार। ३
नामा म्हणे राम व्यापी त्रिभुवन। नाम तें निधान कलियुगीं। ४

२२८०. सार पैं सांगत उपनिषद तुम्हां। वाचे रामनामा जप करा। १
हेंचि पैं मथित सांगोनियां गेले। उच्चारितां ठेले ब्रह्मरूप। २
ज्योतीसी जे ज्योति भजन करील। आपणचि होईल हरी स्वयें। ३
नामा म्हणे कैसें विपरीत करणें। भूतदया धरणें सर्वांभूतीं। ४

२२८१. सर्वांभूतीं हरी आहे आहे साच। मायाजाळ न छळे भाविकांसी। १
सर्व ब्रह्म ऐसें वेद बोले गाढा। ब्रह्मींचा वाडा अगम्य तो। २
जाणतां नेणतां हरीनाम उच्चार। मार्ग तो साचार सुफल सदा। ३
नामा म्हणे कारण जिव्हा होय स्मरण। सर्व नारायण हरी दिसे। ४

२२८२. काळवेळ नसे नामसंकीर्तनीं। उंच नीच योनी हेंहि नसे। १
धरा नाम कंठीं सदा सर्वकाळ। मग तो गोपाळ सांभाळील। २
कृपाळु कोंवसा सुखाचा सागर। करील उद्धार भाविकांसी। ३
नामा म्हणे फार सोपें हें साधन। वाचे नाम घेणें इतुकेंची। ४

२२८३. आपुली पदवी सेवकासी द्यावी। तो एक गोसावी पांडुरंग। १
भावाचा आळुका भुलला भक्तिसुखा। सांपडला फुका नामासाठीं। २
प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी। क्षणएक न सोडीं संग त्याचा। ३
नामा म्हणे आम्हां दीनाचें माहेर। तो एक उदार पांडुरंग। ४

२२८४. सोयरा सुखाचा विसांवा भक्तांचा। विठोबा निजाचा मायबाप। १
कृपाळु दीनाचा पडिभर नामाचा। तोडर ब्रीदाचा साच तया। २

काया मनें याचा संग करा त्याचा। अनंत जन्माचा हरेल शीण। ३ ।
नामा म्हणे आम्हां दीनांचें माहेर। हरी निरंतर न विसंबें। ४ ।

२२८५. दया हेचि दाता मन करी उदार। सर्व हा श्रीधर ऐसें भावी। १ ।
तुटेल यातना होईल वैकुंठ। पंढरी मूळपीठ सेवीं कारे। २ ।
इच्छिती अमर नित्य काळ नेमें। दाटताति प्रेमें सनकादिक। ३ ।
तें हें विठ्ठलनाम पवित्र चोखडें। अंतरामाजी चढे नित्य करी। ४ ।
होतील कामारि ऋद्धिसिद्धी अपार। आपण श्रीधर कुरवाळील। ५ ।
नामा म्हणे येथें न लगेची मोल। विठ्ठल निमोल सर्वांभूतीं। ६ ।

२२८६. देवाचें हें गुज सकळ मंत्रमय। जें कां नित्य ध्येय शंकराचें। १ ।
तें हें रामनाम सेवितां सर्वभावें। रामरूप व्हावें निश्चयेंसी। २ ।
नष्ट अजामेळाचें पतितत्व गेलें। दिव्य रूप झालें वाल्मिकाचें। ३ ।
शरीरसंपत्ति बळीनें देऊनि सकळ। केला द्वारपाळ नारायण। ४ ।
कृष्णाविण दुजे नेणती कायावाचा। झाला पांडवांचा साहाकारी। ५ ।
नामा म्हणे केशव भावाचा लंपट। भक्तांसी निकट रतलासे। ६ ।

२२८७. नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनीं। ऐसी बोले वाणी वेदशास्त्रीं। १ ।
पहा विचारोनि अनुभव मनीं। नका आडरानीं झणीं भरों। २ ।
नामावांचोनि तरलो जे म्हणती। ते आधीं बुडती भवसागरीं। ३ ।
नामा म्हणे नाम ॐकाराचें मूळ। ब्रह्म तें केवळ विटेवरी। ४ ।

## ❖ निर्वाण प्रसंगीचे भजनाचे अभंग ❖

२२८८. अंतींचा लाभु आधींच साधिजे। देह असता कीजे हरिभक्ती। १ ।
आदि मध्य अंती तोचि हा व्यापक। विश्वप्रतिपाळक नारायण। २ ।
विषय महापुरीं जे पतीत जीव भारी। तैशा परीहि हरिनाम घ्यावें। ३ ।
नामा म्हणे दुर्लभ नरजन्मु। केशव मेघश्यामु अनुसरा वेगीं। ४ ।

२२८९ धनमानबळें नाठविसी देवा । मृत्युकाळीं तेव्हां कोण आहे। १ ।
यमाचे यमदंड बैसतील माथां । तेव्हां तुज रक्षिता कोण आहे। २ ।
मायबापबंधु तोंवरी सोयरीं। इंद्रिये जोंवरी वाहताती। ३ ।
सर्वस्व स्वामिनी म्हणविसी कांता। तेहि केश देतां रडतसे। ४ ।
विष्णुदास नामा जातांचि शरण। स्वप्नीं जन्ममरण नाहीं नाहीं। ५ ।

२२९०. अंतकाळीं मी परदेशी। ऐसें जाणोनि मानसीं।
म्हणोनियां हृषीकेशी। शरण तुजसि मी आलों। १ ।
नव मास गर्भवासीं। कष्ट झाले त्या मातेसी।
ते निष्ठुर झाली कैसी। अंतीं दूर राहिली। २ ।
जीवी बापासि आवड। मुखीं घालोनि करी कोड।
जेव्हां लागली यमओढ। तेव्हां दुरी टाकिलें। ३ ।
बहिणी बंधूचा कळवळा। तें तूं जाणसी दयाळा।
जेव्हां लागली यमशृंखला। तेव्हां दूर राहिलीं। ४ ।
कन्या पुत्रादिक बाळें। हीं तव स्नेहाचीं स्नेहाळें।
तुझ्या दर्शनाहुनी व्याकुळ। अंतीं दूर राहिलीं। ५ ।
देहग्रहाची कामिनी। ते तंव राहिली भुवनीं।
मी जळतसें स्मशानीं। अग्निसवें येकला। ६ ।
मित्र आले गोत्रज आले। तेहि स्मशानीं परतले।
शेवटीं टाकोनियां गेले। मजलागीं स्मशानीं। ७ ।
ऐसा जाणोनि निर्धार। मग मज आला गहिंवर।
तंव दाही दिशा अंध:कार। मग मज कांहीं न सूचे। ८ ।
ऐसें जाणोनि निर्वाण पाहीं। मनुष्यजन्म मागुता नाहीं।
नामा म्हणे तुझे पायीं। ठाव देईं विठ्ठला। ९ ।

२२९१. देह आहे तंव करा रे धांवणी । शरण चक्रपाणि रिघा वेगीं । १ ।
येर ते लटिके इष्टमित्र सखे। हे तंव पारीखे सर्व चोर। २ ।
लावूनि मोहातें दास्यत्व करविती। अंतकाळीं होती पाठिमोरे। ३ ।
मायेचे भुरे भुलवी सकळ। हें तुज न कळे कटकट। ४ ।
यापरी आयुष्य वेंचेल रे जना। पुढें यमयातना न चुकती। ५ ।
धोतरा देऊनि सर्वस्व हरीती। नामा म्हणे गति हेचि जनां। ६ ।

२२९२. जळीं बुडबुडे देखतां देखतां। क्षण न लागतां दिसेनाची। १ ।
तैसा हा संसार पाहतां पाहतां । अंत:काळीं हातां कायी नाहीं। २ ।
गारूड्याचा खेळ दिसे क्षणभर। तैसा हा संसार दिसे खरा। ३ ।
नामा म्हणे तेथें कांहीं नसे बरें। क्षणाचें हें सर्व खरें आहे। ४ ।

२२९३. शेवटिली पाळी तेव्हां मनुष्य जन्म। चुकलीया वर्म फेरा पडे। १ ।
याची जन्मीं ओळखी करा आत्मारामा। संसार सुगम भोगूं नका। २ ।
संसारीं असावें असोनि नसावें। कीर्तन करावें वेळोवेळां। ३ ।
नामा म्हणे विठो भक्ताचिये द्वारीं। घेऊनियां करीं सुदर्शन। ४ ।

२२९४. आम्हीं होतों पंढरिसी। आमुची जुनाट मिरासी। १ ।
राही रखुमाई माता। पांडुरंग आमुचा पिता। २ ।
पुंडलीक आमुचा भाई। चंद्रभागा बहिणाई। ३ ।
नामा म्हणे हो शेवटी। घर चंद्रभागे कांठीं। ४ ।

२२९५. देव देव्हारा पाट हृदय संपुष्ट। मधीं कृष्णमूर्त बैसविली। १ ।
प्रेमाचे पाण्यानें प्रक्षाळीन तुज। आत्मस्वरूप निज पांडुरंगा। २ ।
भाव केले गंध भक्तीची अक्षता। वाहिली निढळा देवावरी। ३ ।
मन केला मोगरा चित्त केलें शेवंती। भक्तीची तुळशी अर्पियेली। ४ ।
धूप दीप आर्ती ओवाळीन तुज। एक केशवराज सकळ सिद्ध। ५ ।

त्रिगुणी पक्कान्न केलें ब्रह्मार्पण। वांच्छित भोजन अर्पियेलें। ६ ।
नामा म्हणे देवा सेवा केली एका। पंचप्राण सखा विटेवरी। ७ ।

२२९६. अहो पांडुरंगा रखुमाईच्या कांता। निरोप द्यावा आतां येतों आम्ही। १ ।
राही रुक्माबाई सत्यभामा माता। निरोप द्यावा आतां येतों आम्ही। २ ।
नमस्कार माझा गरुड हनुमंता । निरोप द्यावा आतां येतों आम्ही। ३ ।
नामा विनवी चरणीं ठेऊनियां माथा। निरोप द्यावा आतां येतों आम्ही। ४ ।

शेवटी कापूर लावावा. 'जन्मता पांडुरंगे' आरती म्हणावी व
आकल्प आयुष्य अभंग म्हणावा

## संत नामदेव समाधी, श्री क्षेत्र पंढरपूर महाद्वारांत, आषाढ वद्य त्रयोदशी, शके १२७२

२२९७. आषाढ शुद्ध एकादशी। नामा विनवी विठ्ठलासी।
आज्ञा द्यावी वो मजसि। समाधी विश्रांती लागी। १ ।
आयुष्य कळसासि आले। अभंग त्वा सिद्धी नेले।
ज्ञानेश्वर संगती घडले। तीर्थ मिसे जगदोद्धरण। २ ।
जन्मा आलियाचे कृत्य। जन लावावे सुपंथे।
विठ्ठल मंत्र त्रिभुवनांत। जग जाणत महीमा हे। ३ ।
सर्व सिद्धी मनोरथ। तुझेनि कृपे पावलो समस्त।
म्हणे परीसा भागवत। नामा नाम जपतसे। ४ ।

२२९८. देवा ही विनंती माझी। जे म्यां सेवा करावी तुझी।
आस न धरावी दुजी। या अभिलाषा कारणें। १ ।
तुज म्यां जीवें अनुसरावें। तुम्हीहि तैसेंचि अपंगावें।
आणिकाचें न म्हणवावे। जन्मोजन्मीं दातारा। २ ।
तुज न पोसवे दातारा। तरी या आयुष्या घाली चिरा।
एका या पोटा दुर्भरा। साठीं अव्हेरूं नको गा। ३ ।

वदनीं तुजची वर्णावें। श्रवणीं गुण नाम ऐकावें।
नयनीं चरण न विसंबावे। क्षण एक दातारा। ४ ।
अगा येऊनियां संसारा। न जावें आणिकाच्या द्वारा।
इष्टमित्र सज्जन सोइरा। बंधु आदी करोनि। ५ ।
मज न म्हणोत सकळ जन। परि तूं नको गा उदासीन।
तुझिया नामावांचुन। आणिक नेणें मी दातारा। ६ ।
नाम विक्रय न करावा। दान प्रतीग्रह न घ्यावा।
स्वकष्टार्जित मेळवावा। तोचि ग्रास आपुला। ७ ।
नको दिवट्या छत्र घोडे। जेणें तुजसीं अंतर पडे।
तुझें नामचि आवडे। मज बापुडें म्हणोत का। ८ ।
ऐसा अन्यायी अपराधी। अहो मज तारा कृपानिधी।
तुझें नामचि उच्चारी आधीं। थोर अट्टाहास करुनि। ९ ।
विष्णुदास नामा म्हणे। आम्हां उपेक्षिसी झणे।
जन्मोजन्मींचे पोसणें। केशवा उणें येऊं नेदी। १०।

२२९९. पंढरीचा वास चंद्रभागे स्नान। आणिक दर्शन विठोबाचें। १ ।
हेंचि मज घडो जन्मजन्मांतरीं। मागणें श्रीहरी नाहीं दुजें। २ ।
मुखीं सदा नाम संतांचें दर्शन। जनीं जनार्दन ऐसा भाव। ३ ।
नामा म्हणे तुझें नित्य महाद्वारीं। कीर्तन गजरीं सप्रेमाचें। ४ ।

२३००. महाद्वारीं सुख असे या सुखाचें। लागती संतांचे चरणरज। १ ।
म्हणोनियां स्थळ पाहिलें निवांत। झालें तेथे चित्त समाधान। २ ।
सकळ वैष्णवांसहित बोळवण करा। तुम्ही हो दातारा मजलागीं। ३ ।
देव म्हणे नामया राहें पक्षभरी। पुरतील अंतरीं कोड तुझें। ४ ।

२३०१. स्फुंदस्फुंदोन नामा उभा महाद्वारीं। चित्त पायांवरी विठोबाच्या। १ ।
उभा दीनानाथ उभारुनी बाहे। पालवीत आहे पीतांबरें। २ ।

आरता येरे नामया धरिला पोटासीं । कोणें गांजिलासी दुर्जनानें । ३ ।
अंतरींचें सांग पडे माझ्या मागें। कां करिशी उद्वेग संसारींचे। ४ ।
नामा म्हणे विठो असें मी नेणता। आठवीं पंढरिनाथा वेळोवेळां। ५ ।

२३०२. आम्ही विष्णुदास सांडिली वासना। तुम्ही नारायणा कळों आला। १ ।
अज्ञान बाळक ठकविला धुरु। तैसा मी अधीरु नव्हे देवा। २ ।
उपमन्या बाळका दुधाचा पैं छंद। तैसा मी मतिमंद नोहे देवा । ३ ।
शरण आला तुज मूर्ख बिभीषण। लंकाराज्य तेणें मागितलें । ४ ।
नामा म्हणे तुझें नलगे आम्हां कांहीं। वास सदा देईं चरणाजवळी। ५ ।

२३०३. मनें ध्यान करणें वाचे उच्चारणें। नयनें तुज पाहणें हेंचि देईं। १ ।
करें पूजा करणें माथा चरणीं ठेवणें। श्रवणीं गुण ऐकणें हेंचि देईं। २ ।
षट् चक्रावरी मार्ग बावन्न अक्षरीं। निरालंब निरंतरीं भेटी देईं। ३ ।
मनसा वाचा कर्म आणि दश इंद्रियें। तुझ्या चरणीं दृढ होय ऐसें करीं। ४ ।
डावी उजवीकडे आणि मागें पुढें। अंतीं चरण जोडे ऐसें करीं। ५ ।
नामा म्हणे केशवा तुझी मज गोडी। जन्मोजन्मीं जोडी हेचि देईं । ६ ।

२३०४. श्रीमुखाची सोय पाहों म्हणों जरी। एवढा अधिकारी कैंचा देवा। १ ।
चरणांजवळूनि नसावें जी दूरी। जन्मजन्मांतरीं हेंचि देईं। २ ।
तुज देतां सोपें मज तृप्ति अल्प। सर्वज्ञा साक्षेप सांगतसें। ३ ।
अनाथाचा नाथ हें तों ब्रीद साच। न करावें उदास नामा म्हणे । ४ ।

२३०५. माझिया मनें मज उपदेश केला। तो मज बिंबला हृदयकमळीं। १ ।
निर्वाणींची एक सांगितली खूण। कैवल्य चरण केशवाचे। २ ।
वेदशास्त्र श्रुति आणीक पुराणें। पढोनि जाणणें हेंचि सत्य। ३ ।
क्रिया कर्म धर्म करणें ज्या कारणें। ते खूण निर्वाण चरण हेचि। ४ ।
जप तप अनुष्ठान करोनि साधन। प्रत्यक्ष निधान चरण हेचि। ५ ।
नामा म्हणे मज कळलें अनुभवें। न विसंबें जीवें चरण तुझे। ६ ।

२३०६. रुसलासे नामा उभा गरूडपारी। पितांबरधारी पालवीतो। १।
आपल्या सुखाचा तुज देईन वांटा। जरी येसी वैकुंठा एक वेळ। २।
आपुले निजपदीं तुज बैसवीन। उभा मी राहेन मागें पुढें। ३।
पीतांबर छाया करीन तुजवरी। जीवें क्षणभरी विसंबेना। ४।
अंबऋषी प्रल्हाद ध्रुव रुक्मांगद। त्याहुनि निजपद देईन तुज। ५।
ऐसा धीर नामया होता माझ्या मनीं। परी तूं सर्वांहूनि उदासीन। ६।
नामा म्हणे केशवा नलगे माझ्या चित्तीं। मज आहे विश्रांती तुझ्या नामीं। ७।

२३०७. प्रेमपडीभरु देवासी वोसंडे। नामा तयापुढें शोभतसे। १।
प्रेमाचें स्फुंदन न सांवरे नामया। पसरोनियां बाह्य क्षेम देत। २।
सावध रे नामया आलिंगिला बाहीं। आवडतें कांहीं सांग मज। ३।
उघडोनियां नयन पाहे दृष्टीभरी। वैकुंठा भीतरीं चाल जाऊं। ४।
ऐकोनियां नामा झालासे सावध। मग देतसे शब्द नारायणा। ५।
भक्तीवीण सुख नेघे पैं वैकुंठ। पंढरीं प्रगट परब्रह्म। ६।
हेंची गोड आम्हां आवडे हो हरी। वैकुंठाभीतरीं चाड नाहीं। ७।
सर्वकाळ सेवा करूं पैं कीर्तन। येणें माझें मन संतुष्ट सदा। ८।
संबोखिला नामा हृदयावरी हस्तक। येरु ठेवी मस्तक चरणावरी। ९।
मागरे नामया आवडेल जितुलें। त्रीभुवनाइतुलें ब्रह्मसुख। १०।
देईन अखंडीत सर्व काम जाणा। रिद्धिसिद्धि पूर्ण अखंडीत। ११।
नामा म्हणे पंढरीं कीर्तन करीन। न सोडीं चरण परी तुझे। १२।

२३०८. वैकुंठासी आम्हां नको धाडूं हरी। वास दे पंढरीं सर्वकाळ। १।
वैकुंठ कोपट जुनाट झोंपडी। नको अडा अडी घालूं आम्हां। २।
वैकुंठीं जाऊनि काय बा करावें। उगेंचि बैसावें मौनरूप। ३।
नामा म्हणे मज येथेंच हो ठेवीं। सदा वास देईं चरणांजवळी। ४।

२३०९. घेऊनियां नामया बैससील किती। पहाशील स्थिति अंतरींची। १।
कांहींच न होसी विचारी मानसीं। चैतन्य तत्वासि शुद्धबुद्ध। २।

क्रिया कर्म कर्ता नव्हेसी सर्वथा। आहे सर्वगता रूप तुझें । ३ ।
भजतां भजन पूजिता पूज्य । हेंही काय तुज आथीचना। ४ ।
ज्ञाता ज्ञान ज्ञेय ध्याता ध्यान ध्येय। नाथिले उपाय नाहीं तुज । ५ ।
नामा म्हणे मज नकळेचि देवा। मज देईं सेवा जन्मोजन्मीं। ६ ।

२३१०. जन्मजन्मांतरीं घेतलें धरणें। सांग कवण्या गुणें विष्णुदासा। १ ।
कांहींच न घेसी कांहीं न मागसी। ऋणें किती करिसी सेवारूपें। २ ।
चतुर्विध मुक्ति अथवा धन संपत्ति। नलगे तुझे चित्तीं काय करूं। ३ ।
समुद्रवलयांकित अवघें भूमंडळ। अथवा रसातळ दुर्लभ कांहीं। ४ ।
भेटिलागीं आर्त आहे रे वैकुंठ। पाही तुझी वाट रात्रंदिवस। ५ ।
नामा म्हणे सर्व ओसंडिलें चित्तें। तुझिया चरणापरतें नलगे कांहीं। ६ ।

२३११. माझिया मनासीं म्यां केला विचार। तेणें मज निर्धार सांगितला। १ ।
मज नलगे मुक्ति नलगे ब्रह्मज्ञान। सांडोवा होईन पंढरीचा। २ ।
इंद्रियां मारितां येती काकुळती। तुज ओळगूं म्हणती ठायीं ठायीं। ३ ।
श्रवणीं श्रवण अखंड तुझी कीर्ति। विश्व विठ्ठल मूर्ति देखेन डोळां। ४ ।
नामामृतें रसना निवाली त्या सुखें। नाठवती दु:खें जन्मांतरींचीं। ५ ।
नामा म्हणे ऐसा कोण भाग्यहीन। जो धरी वासना वैकुंठींची। ६ ।

२३१२. ऐसा नामा बोले आनंदें करोनी। तंव देव विचारूनि बोलियेले। १ ।
भला भला नामया शहाणा झालासी। कां रे हें न घेसी सांग मज। २ ।
येरु म्हणे देवा अवघेंची नैश्वर। तूंची एक सार पुरे आम्हां। ३ ।
अनंत कोटी ब्रह्मांडें वसती रोमरंध्रीं। त्या चरणाचे अग्रीं वसों आम्ही। ४ ।
पुंडलीक जाणे त्याचें गुह्य गुज। उमजोन तुज काय सांगों। ५ ।
नामा म्हणे धरूं मुळ सोय चोंखडी। ब्रह्मांडा येवढी नलगे पृथ्वी। ६ ।

२३१३. वतन आमुची मिरासी पंढरी। विठोबाचे घरीं नांदणूक। १ ।
सेवा तेथे करूं नित्य महाद्वारीं। नामाची उजरी जागवूं तेथें। २ ।

साधुसंतां शरण जाऊं मनोभावें। प्रसाद स्वभावें देती मज। ३ ।
नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे। संत पाय हिरे वरी देती। ४ ।

२३१४. परियेसीं नामया सांगतों मी तुज। अंतरीचें गुज भक्तराया। १ ।
तूं माझें आवडतें कृपेचें पोसणें। चित्ताचें बैसणें करीन तुज। २ ।
येणें संतसंगें यावें माझ्या गांवा। भोगावें राणिवा वैकुंठींच्या। ३ ।
माझिया कथेची ज्या बहु आवडी। माझी प्रेम गोडी पढीये जया। ४ ।
त्याची पायधुळी लागावी सर्वांगें। म्हणोनि मागें मागें हिंडतसें। ५ ।
भक्त त्या यातीचे भलतेनी भावे। भलते एक घ्यावें नाम माझें। ६ ।
त्याचिया उपकारें दाटे मी सर्वथा। मुगुट करुनी माथां वाहीन त्यासी। ७ ।
तनु मन प्राण दिधलें जेणें मातें। मजहूनि पढीयंतें नाहीं त्यासी। ८ ।
चिंता न करीं नामया नुपेक्षी सर्वथा। अभयकरू माथां ठेविला देवें। ९ ।

२३१५. क्षण एक एकांतीं बैसोनि निवाडे। सांग मजपुढें आवडे जें जें। १ ।
सीण भाग आपुला सांगें पैं वहिला। असेल जो वाटला मजवीण। २ ।
पुरवीन जीवींचें सर्व तुझें कोड। गगनाहुनि वाड असेल जरी। ३ ।
वाटे माझें सर्व द्यावें तुझे हातीं। नामरूप वृत्ति सहित मन। ४ ।
परी सर्वभावें तुझें उदासीन चित्त। उरलें माझें आर्त कवण पुरवी। ५ ।
म्हणोनि पांडुरंगें धरूनि हनुवटी। सांगे जीवींच्या गोष्टी नामयाजवळी। ६ ।

२३१६. केशव म्हणे नामयासी। जैं तूं दुरी धरिला होतासी।
तैं तूं काकुळती भाकिसी। मजलागीं हिंडसी दाही दिशा। १ ।
तुझें गाऱ्हाणें सांगो संतांपाशीं। तीहीं तुज सरतें केलें भक्तिसी।
मी तंव वंद्य तिहीं लोकांसी। त्वां तंव मजशी प्रजियेलें। २ ।
आमुचीं वर्में बोलतोसी। सलगी करूनि फार जातोसी।
उंच पदवी दिल्या पाइकासी। तरी काय स्वामीसी भिऊं नये। ३ ।
मी विश्वासलों तुझिया भावासी। परि तूं शब्देंहि न पुससी।
म्यां तंव अमृतदृष्टीं पाहिलासी। अढळपदासी दावियलें। ४ ।

